# पाणी

बा. सी. मढकर

युगवाणी प्रकाशन

प्रकाशक :

वा. वि. भट यानी हे पुस्तक
अभिनव प्रकाशनतर्फे छापून
युगवाणी प्रकाशन साठी प्रसिद्ध केलं.
१२ त्रिभुवन रोड, मुंबई ४.

●



●

मुद्रक :

वा. वि. भट
फेमस प्रिंटर्स,
१२ त्रिभुवन रोड,
मुंबई ४.

●

आवृत्ति पहिली
१९४८

●

किंमत
तीन रुपये

‘ ताबड्या माती ’ नंतर हे ‘ पाणी ’

प्रस्तुत लिखाणात भलंबुरं काय आहे ते वाचक ठरवितीलच. पण एक उणीव जाणवते. ‘पाणी’च्या कालमर्यादेत १९४२ मोडते, तिच्या चौकटीत ते कोरण्याचा प्रयत्न केला असता तर मूळ उद्देश डावलावा लागला असता. चौकटीच्या मर्यादा १८५७ ते १९४७ अशा केल्या म्हणजेच १९४२ चे अंक व्यवस्थित बसतील. ते काम मराठीच्या भाग्याने एखादा टॉलस्टॉय अगर हार्डी आज ना उद्या खास करील.

‘ ताबड्या माती’ प्रमाणे ‘पाणी’तही भाषेची घडण केवळ वातावरणाखातर ठिकठिकाणी बदलली आहे. त्यातील चुका जाणत्यांनी माफ कराव्या.

१९४८ —बा. सी. मर्ढेकर



श्री. बा. सी. मर्ढेकर यांचीं पुस्तकें



प्रसिद्ध

*Arts & Man* ( प्रबंध )

*Two Lectures on an Aesthetic of Literature.* ( प्रबंध )

वाङ्मयीन महात्मता ( प्रबंध )

शिशिरागम ( कवितासंग्रह )

कांहीं कविता ( कवितासंग्रह )

रात्रीचा दिवस ( दीर्घकथा )

तांबडी माती ( दीर्घकथा )

पाणी ( कादंबरी )

आगामी

आणखी कांहीं कविता ( कवितासंग्रह )

# — १ —

“ ..... । पहिली सोल शिवाजी महाराजांची । दुसरी सोल अंबाबाईची । तिसरी सोल तानाजी सुभेदाराची ॥ पट्टे घेतले तोंडामधीं । सोल धरिली दांतामधीं । आपल्या बेताचे माणूस पन्नास मोजीलें । सुभेदार गडावर चढले ॥ पन्नास कमी बारा हजार फौज । खालीं होती त्यानें एकच गर्दी केली ॥ सूर्याबा जो बंधु । त्यानें एकच गर्दी केली ॥ दृष्टा वरती गेला । बारा हजार फौजेनें हात सोलाला घातला ॥ तीन पुरुष वरती गेले । सोल मधींच तुटली ॥ पन्नास कमी बारा हजार । फौज धरणीवर पडली ॥ जी जी ॥ ......”

भगतपूरचा आधळा गोविंद शाहीर आपल्या खड्या आवाजात आणि एकतारीच्या व खंजिरीच्या साथीबरोबर तानाजी मालुसऱ्याचा पोवाडा म्हणत होता. आजुबाजूला बसलेला भगतपूरचा सारा मराठमोळा थरारून ऐकत होता.

मावळखोऱ्यातलं भगतपूर हें एक लहानसं खेडं होतं. उजव्या बाजूनें कृष्णा आणि डाव्या बाजूनें एक मोठा ओढा यानीं केलेल्या सह्याद्रीच्या एका त्रिकोणी कुशींत भगतपूराने आपलं ४००–५०० जीवाचं घरटं

बाधलं होत. त्रिकोणाच्या पुढे कृष्णच्या दोन्ही तीरावर पसरलेली जोधळ्याचीं शेतं आणि फळभाजीचे मळे भगतपूरचं पोटपाणी होत. आश्विनाच्या महि-न्यात जर कुणी कृष्णेच्या काठाने गेल असत तर भगतपूरचा जोधळा साऱ्या मावळखोऱ्यात का प्रसिद्ध झाला होता हे त्याला समजायला फारशी अडचण पडली नसती. ‘ भरलेला दाणा तर भगतपूरचा आणा ’ अशी बढाई भगत-पूर मोठ्या दिमाखानें मारीत असे. दिवस खाली गेला म्हणजे गुराच्या पुढ चारा टाकून, त्याच्या पाठीवर प्रेमाने थोपटून भगतपूरचा शेतकरी घरात येई, अन् आपल्या पिलाना अवतीभंवती घेऊन मिण्मिण् दिव्यातही लखलखणाऱ्या पितळेच्या थाळ्या पुढें ओढून धगधगणाऱ्या चुलीजवळ जोधळ्याची भाकरी राधणाऱ्या घरधनिणीकडे कौतुकाने तगादा लावी की ‘वाढ लवकर’ म्हणून. त्याच्या अधीरतेला तितक्याच कौतुकाने आणि खोट्या रागाने टोमणा मारीत, वाग्याची भाजी आणि स्वत: काढलेल्या धारेच दूध सगळ्याना वाढून घरधनीण चुलीपुढील ताबुस गरमागरम भाकरी त्याच्या पुढ्यात ढकली. त्या भाकरीचा सुवास जर कुणी घेतला असता, तिचा एक घास जर कुणी खाल्ला असता तर भगतपूरच्या जोंधळ्याला दोन कोसावरच्या गोठवाडीच्या आठवडे बाजारात इतकी मागणी का असे याचा उलगडा त्याला सहज झाला असता !

भगतपूरच्या जोधळ्याने गोठवाडीच्या आठवडे बाजारात जस आपल नाव परवापर्यंत गाजवल होत, तसच पूर्वी मराठेशाहीत भगतपूरच्या मराठा-गड्यान आपल्या तलवारीचं तेज दाखविल होत. पण इग्रजाच राज्य आल तेव्हांपासून भगतपूरच्या मावळ्याच आयुष्य साध आणि सथपणे कृष्णेच्या प्रवाहाच्या तालावर चालल होत. पावसाळ्यात कृष्णा दुथडी भरून घोगावत वहायची आणि पुष्कळदां भगतपूरचा दगडाचा घाट पाण्यात बुडून जायचा. अशावेळीं डावीकडून दोन्ही तीराना बगलेत घेऊन फुगलेला ओढा जिथे

कृष्णेला मिळायचा तिथे तर भोवऱ्याच्या मनोहर वर्तुळाकृतीच्या फेसाळ लहरी घाटाच्या टोकाशी असलेल्या वडाच्या फांद्या कुरवाळीत गिरक्या घ्यायच्या. अन् पुराच पाणी वडाच्या अर्ध्याअधिक बुध्याच्याही वर चढायला लागल की पावसाने कुडकुडणारी वानर भयभीत मुद्रेने अधिकाधिक वरच्या फांद्याच्या आश्रयाला जायची. कृष्णेच पाणी जसजसं वर चढायच तसतशी भगतपूरच्या तरुण मराठा गड्याच्या अंगात पोहण्याची वीरश्री खेळू लागायची. घाटालगतच्या विठोबाच्या मंदिरापुढील उंच दगडी बुरुजावरून एकएक लंगोटबंद पाहणारा* गडी पटापट पुराच्या जर्द ताबुस पिंवळ्या गढूळ प्रवाहात उडी मारायचा—की झाली भगतपूरच्या पोहण्याच्या शर्यतीला सुरवात ! पावसाळ्यातल्या ह्या शर्यतीच्या दिवसाकरिता भगतपूरचा प्रत्येक तरुण गडी हपापलेला असायचा. आणि ही शर्यत जिंकण्याचा निश्चय करून पाण्यात उडी टाकायचा. पण कृष्णेच्या पात्रातली मधली धार अर्धीअधिक कापीपर्यंत बहुतेकाचे हात लुळे व्हायला लागायचे, आणि कसे बसे ते पलीकडच्या तीरापर्यंत धडपडत जायचे. पण शर्यत जिंकायची म्हणजे नुसत पुराचं पाणी कापीत पैलतीराला पोहोचून उपयोगी नव्हत. तर, पैलतीराला पोहोंचून पाय न टेकता लगेच परत ऐलतीराला येऊन पोहोंचावं लागत होत ! पण इतकीही हिंमत असलेला मराठा गडी भगतपुरात दर वर्षी निदान एक तरी निघायचाच !

पावसाळ्यात कृष्णेला पाणी जरी पुष्कळ वेळा चढायचं तरी मोठा शर्यतीचा पूर असा एक दोन वेळाच यायचा. आणि तोही चोवीस तासावर फारसा टिकायचा नाहीं. पण पूर ओसरला तरी भगतपूरच्या मराठ्याला कृष्णा ओलांडायची म्हणजे मांड्या इतक्या पाण्यातून जावंच लागायचं. त्यामुळें वर्षातले आठ महिने शेतावर राबणारा भगतपूरचा मराठमोळा पावसाळ्यांत एकंदरीने जरासं एकलकोंडंच आयुष्य कंठायचा. पावसाळ्यातल्या पहिल्या

सरीबरोबर शेताची पेरणी झाली म्हणजे त्याचा जीवनक्रम थोडासा मद, एक रंगी, एक रागी बनायचा. मेघराजाच्या कृपेने शेतातल बी रुजायच; इवलाली हिरवी रोपटी, त्यातून आपलीं कोमल पान वाऱ्यावर डुलवायला लागायची, त्या पिकानीं पाखरलेल रान हळू हळू वर शेडा करीत वाढायच, आणि आनंदात आनंद म्हणजे ते कणस धरायला सुरवात करायच, नतर एक एक दाणा भरायचा अन् एक एक कणीस फुलायच! कृष्णामाई ओलाडायला मिळाली कीं, हीं सर्व स्थित्यतरं न्यहाळीत शेताची पहाणी करून यायचं या पलीकडे भगतपूरच्या मराठमोळ्याच्या जीवनात ज्येष्ठ आषाढ ते भाद्रपद आश्विनापर्यंत दुसरा रग मिळणं कठीण.

भगतपूरच्या मराठमोळ्याच्या या अभाळी जीवनात प्रसन्नतेचं इंद्र-धनुष्य खुलायला लागायच तें अर्धा अधिक आश्विन मास सपल्यावर! शेता-वरच सोनं उतरून घरीं आणायला अजून अवकाश असला तरी पोळ्याच्या बैलाच्या शिंगावर शेदरी, तांबडा, किरमिजी, निळा किंवा हिरवा रग चढवून नि त्याना सोनेरी किंवा रुपेरी जिलई कागदाच्या किनारीनी मढवून दसऱ्याच सोनं लुटता लुटताच भगतपूरचा मराठमोळा दिवाळीकरता पण त्याची खरेदी करायला लागायचा. मग साऱ्या भगतपूराच्या गरजा भागविणार एकच एक गुलाब वाण्याचं दुकान होत, त्यावर कधीं गिऱ्हाइक नाही असं व्हायचं नाही. अन् भगतपूरच्या छोट्या मराठमोळ्याचा सुरुग, सुरसुऱ्या, चंद्रकला, लहान बारी नि मोठ्या बाराचे फटाके, पिस्तुलाच्या टिकल्या, निरनिराळ्या रंगाच्या आगपेट्या वगैरेकारिता लागणारा अखड तगादा पुरवतां पुरवता गुलाब वाण्याला रात्रीचे दहा वाजायचे!

प्रसन्नतेचं हें इंद्रधनुष्य किती विविध रगांनीं भरलेलं असायचं हे पहायचं असेल तर कुणीही आश्विनातला फक्त एकादा दिवस भगतपूरात काढायला हवा होता. पूर्वेकडून करवंदीच्या रानात लपलेला सूर्य वर येण्यापूर्वीच

गोठयातल्या गुराना सकाळच्या कोंबडयाची चाहूल लागायची. नि घरातल केर काढून घरधनिणीचे हात गाई-म्हशींच्या आचळावर ठरतात न ठरतात तोच भगतपूरच्या साऱ्या गोठयातन वासराच ओरडण आणि पिळलेल्या आचळातून भाडयात पडणाऱ्या दुधाच्या कर्रर धर्रर कर्रर सर्रर धाराची गोड स्वरगुफण यानी सार वातावरण भरून जायच ! एकीकडे कुडत पागोट चढवून शेतीव‹ जाऊन यायला निघालेले शेतकरी, तर दुसरीकडे हातात धड किंवा फुटलेल्य स्लेटपाटया, बिगरीच किंवा पहिलीच किंवा फार फार तर चौथीच बाळबाध पुस्तक नि ' पेण्सल ' घेऊन भगतपूरच्या मराठी शाळेला जाणारी मुलं जरा दिवस डोक्यावर यायला थोडा अवकाश असताना आश्विनातल्य एकाद्या एकाकी ढगावर बसून भगतपूरावर नजर टाकली तर किती तरी निरनिराळया प्रकारचीं चित्र दिसलीं असती ! शेतावरून परत येता येत रामजी पाटील गुलाब वाण्याशी बोलायला उभा रहात आहे, कबरेला धोतर गळ्यात जानव, कपाळावर भस्म आणि हातात पळीपचपात्र असा शकर भटजी विठोबाच्या देवळातून बाहेर पडता पडता खड्डू मास्तराना नमस्का‹ करून घरी चालला आहे; ताज्या ताकाच भाड भरून सगुणाबाई यमुना काकूंकडे पोहोचवीत आहे, गणू पाडू रस्त्यात भेटला म्हणून लाजून डोक्यावर पदर ओढून अधिकच झपाटयाने घरी जाणारी मैना; विठोबाच्या दवळाच्या भिंतीवरील वाघाच चित्र रगवीत असता क्षणभर थाबून तबाखू-जर्दा हातात चोळून त्याचा बोकणा भरणारा रंगारी पीताबर; हीं भगतपूरच्या रस्त्यातील दृश्ये ! तिकडे घाटावर निरनिराळ्या अंतरावर कपडे धुणाऱ्या बायका आणि त्याच्या धुणें आपटण्याचे तालबद्ध आवाज; सकाळची शाळा संपवून, पुस्तक-पाटी घरीं ठेऊन आलेलीं कृष्णेच्या पात्रात डुबणारी, खेळणारीं मुलं; आणि त्यांच्या जोडीला त्याच्यापेक्षा कमी खेळकरपणाने पण त्याच्या इतक्याच आनंदाने थंडगार पाण्यात स्नान करायला उतरलेली मोठी मडळी; सारा घाट असा नुसता

फुललेला! भगतपूरच्या या जीवनक्रमावर सध्याकाळचा सूर्यनारायण आपली मोहक प्रभा फाकायला लागायचा. पलीकडच्या प्रतापगडाच्या शिखरावर त्याची सोनेरी किरण थोडावेळ विश्राति घ्यायची, पश्चिमच्या आकाशात रग भरायचे, आणि गवतावरची पाढरी, पिवळीं, निळी इवलाली फुल वाऱ्याच्या झुळुके-बरोबर डुलता डुलता आकाशातल्या एकाद्या रंगाला आपल्या पाकळ्यात झेलून मिटायला लागायची. काळोखाची पहिली सावली येता येता गाई हंबरायच्या; देवळात रामजी पाटील, सोनू हेलकारी, खडू मास्तर आणि इतर वयस्क सवंगडी जमायचे, प्रत्येक घरघरट्यातून मिणू मिणू दिव्याची मंद आरास उभी व्हायची, आणि एकामागून एक अशी शे दोनशे धुराडी काळ्या पाढऱ्या धुराची विचित्र वर्तुळे संथपणे आकाशात सोडायचीं!

आणि आकाशात तारे चमकायला लागले म्हणजे अशाच आश्विनातल्या एकादे दिवशी घाटाच्या टोकाला असलेल्या वडाखालीं भगतपूरचा सारा मराठमोळा आधळ्या गोविंद शाहीराचा पोवाडा ऐकायला जमायचा!

—पण हे सारं बघायला आपल्याला १९१४ सालच्या पूर्वीच्या आश्विनातला दिवस निवडायला हवा होता. त्यानतर पहिल्या महायुद्धाची झळ भगतपूरला चाटून गेली. आणि १९१९ सालच्या आश्विनातल्या ज्या दिवशी कृष्णामाईच्या झुळझुळ प्रवाहालगत भगतपूरचा मराठमोळा आधळ्या गोविद शाहीराचा तानाजी मालुसऱ्याचा पोवाडा ऐकायला त्या जुन्या वडाखालीं जमला होता, त्या दिवशीं त्या वडाच्या फाद्या चार अधिक उन्हाळ्यानीं वाळून गेलेल्या पानाचा पाचोळा विसरीत नव्या पालवीची जोपासना करीत होत्या!

**"... सुभेदार भला। नाहीं तो जाग्यावरून हालला॥ सुभेदार भला। त्यानें धांवा अंबेचा मांडला॥ अंबाबाई तूं पाव गे माझ्या नवसाला। नऊ हात जमीन उडाला। बाराजण लढक्यांची। चोवीस खांडोळीं पाडलीं॥..."**

आधळ्या गोविंदशाहीराचा खडा आवाज हे वाऱ्यावर थरारणारे बोल फेकीत होता.

पाठीमागे भगतपूरच्या बैठ्या घराच्या काळोखात अस्पष्ट झालेल्या आकृत्या नि त्याच्या उघड्या खिडक्यातून मधून मधून तेवणाऱ्या मिण् मिण् दिव्याचा अधुक प्रकाश, त्या घराच्या छपराच्या नागमोडी रांगवर निळ निरभ्र आकाश नि त्यात तेवणाऱ्या लख् लख् ताऱ्यांच चमकणार तेज! पुढे ते मोठ वडाच झाड नि त्याच्या लोंबणाऱ्या पारब्या, त्याच्याखाली एक काळ फाटक घोंगड अथरून त्यावर वीरासन घालून बसलेला आंधळा गोविंद शाहीर, त्याच्या एका बाजूला खंजिरी वाजवणारा त्याचा भाऊ आणि दुसऱ्या बाजूला एकतारीची तार छेडणारी त्याची आठ नऊ वर्षांची मुलगी, आणि त्या तिघांवर पाठीमागून अस्थिर, फडफडणारा मंद प्रकाश टाकणारी जळती मशाल; आणि सभोवती जमलेला सारा मराठमोळा!

आंधळा गोविंद शाहीर जन्मापासून आंधळाच होता. पण पाचसात वर्षांचा असतानाच त्याने आपल्या आवाजाची गोडी भगतपूरला पटवून दिली होती. जन्मापासून आंधळा असल्यामुळे तो आपल्या भावाबरोबर भगतपूरच्या मराठी शाळेत नियमाने गेला असूनही त्याच शिक्षण कानावर पडलेल्या माहिती पुरतच मर्यादित होत. पण शाहीराच्या घराण्यात जन्मलेल्या मुलाला नितळ, खड्या आवाजाची देणगी असल्यावर आठ औट किती हे चटकन् सांगता आल नाहीं किंवा मुंबई इलाख्यातल्या सगळ्या नद्यांची नावं पाठ म्हणून दाखविता आली नाहीत तरी फारसं बिघडत नाही. नाना शाहीराने हे ओळखूनच गोविंदाला आपल्याबरोबर साथीला घ्यायला सुरवात केली. आणि नाना शाहीर वारल्यावर सत्तावीस अठ्ठावीस वर्षांचा आंधळा गोविंदा आंधळा गोविंद शाहीर बनून, आपल्या धाकट्या भावाचा हात धरून भगतपूरच्या वडाखालीं आला आणि नाना शाहीराच्या घोंगडीवर, नाना शाहीराच्या

जागेवर पहिल्या प्रथमच बसला. डफावर थाप पडली, तुणतुण्याची तार छेडली गेली आणि आंधळ्या गोविंद शाहीराने खडया आवाजात आपला पहिला पोवाडा म्हटला, तेव्हा भगतपूरच्या साऱ्या मराठमोळ्याने कौतुकानें भरलेल्या हृदयाने त्याची वाहवा केली ! काळ्याभोर सतेज डोळ्याचा नाना शाहीर गेला, पण गाढ काळोखी बुब्बुळाच्या आंधळ्या गोविंद शाहीरानें भगतपूरच्या जीवनात आपल्या बापाची जगा भरून काढली आणि साऱ्या मराठमोळ्याकडून प्रशंसा आणि धन्यवाद मिळवले.

१९१४ सालातल्या तीस वर्षाच्या आंधळ्या गोविंद शाहीराच्या खडया आवाजाला आज १९१९ सालात एक अधिकच आकर्षक झार प्राप्त झाली होती. विठोबाच्या देवळात संध्याकाळच्या आरतीला नियमाने, न चुकता आपल्या मुलीचं बोट धरून येणारा आंधळा गोविंद शाहीर आरती झाल्यावर पुढील मंडपात आल्या गेल्याशी गप्पा मारीत बसायचा. त्यावेळीं त्याच्या कानावरून अनेक गोष्टी गेल्या होत्या. कारण भगतपूरच्या अनेक घरावर १९१४ ते १९१९ मध्ये एक प्रकारची उदासीनता पसरली होती. कुणाचा मुलगा तर कुणाचा घरधनी, कुणाचा चुलता तर कुणाचा सासरा; कुणाचा भाऊ तर कुणाचा नातू, साधारणपणें बऱ्याच घरातील कुणी ना कुणी, या ना त्या निमित्ताने भगतपूर सोडून गेलेला होता. त्यामुळे ही चार वर्षे म्हणजे भगतपूरच्या मराठमोळ्याच्या जीवनातील तुटलेल्या धाग्याचा, विटलेल्या रंगाचा एक पट होता. दैवाच्या मागावर कुणास ठाऊक यापैकीं कोणते धागे पुन्हा जोडून घेतले जाणार होते ! कोणते रंग पुन्हा भरून येणार होते ! पण भगतपूरच्या सुखदुःखाचे सूर रोज ऐकता ऐकता आंधळ्या गोविंद शाहीराच्या जागत्या अंतःकरणात जन्ममृत्यूची एक नवीनच रागदारी निर्माण होत होती. आणि कृष्णाकाठच्या त्या जुनाट वटवृक्षाखालीं बसून जेव्हा तो पोवाडयाचे एकेक चौक म्हणू लागायचा तेव्हा त्या

जन्ममरणाच्या रागदारीचे पडसाद त्याच्या खणखणीत आवाजातून उमटायला लागून त्या आवाजाला एक प्रकारची हृदयस्पर्शी नि रसरशीत धार यायची !

जुन्या इतिहासाच्या रसाळ वर्णनाला नव्या इतिहासाच्या अव्यक्त हृत्कपनाने ज्यात अनिर्वचनीयपणें प्रकर्षित केलं होतं असा तो पोवाडा वातावरणात दुमदुमत होता. त्यातील शब्द आधळ्या गोविंद शाहीरा-भोवती जमलेल्या निश्चल मराठमोळ्याच्या अंतःकरणाचा ठाव घेत घेत कृष्णामाईचा सथ प्रवाह ओलाडून पलीकडच्या कांठाला एका मोठ्या पाषाणावर बसलेल्या एका एकाकी शिपाईगड्याच्या कानावर, पाखराची पिसं अगावर पडावीं त्याप्रमाणे पडत होते...

..."दोहों हातांचा मुजरा सांगा शिवाजी महाराजाला । उदेभान मोंगल बारा हात जमीन उडाला । वचक सुरवाईच्या दाविला मारा कैफाचा केला । पन्नास वेढे पागोठ्याचे पन्नास वेढे मंदिलाचे बेंबीपावेतों चिरीत नेला । सुभेदार धरणीला लोटीला ॥..."



## — २ —

हळू हळू पाणी कापीत कापीत १९१९ सालातल्या एके दिवशी सकाळीं दहाच्या सुमारास तुकाराम सदोबाची मोठी फौजी आगबोट मुबई बंदराला लागली. तुकाराम आपल्या पलटणीतल्या इतर शिपायासह डेकवर उभा होता. मायभूमीला इतक्या वर्षानंतर परत आलेले ते सर्व शिपाई गडी होते. हिंदुस्थानचा किनारा सोडला तेव्हा त्याच्याबरोबर असलेले काही गडी आज त्याच्यात नव्हते. जे होते त्यापैकीं बऱ्याच गड्यावर लढाईच्या आठवणी हाडामासात कोरल्या गेल्या होत्या. त्यापैकी काहीं कोरीव आठवणीवर खाकी पोषाखाच पांघरूण होत. इतरावर कुठलंच पांघरूण नसल्याने त्या स्पष्ट दिसत होत्या. काहींवर पाघरूण घातलं असलं तरी त्या स्पष्ट दिसत होत्या. तुकाराम सदोबाच्या खाकी कोटाची डावी बाही असल्याच एका कोरीव आठवणीवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करीत होती. पण तिच्या सैल, ढिलेपणानें तो प्रयत्न केविलवाणा दिसत होता. पलटणींतल्या सर्व गड्यांच्या तोंडावर मात्र केविलवाणेपणा किंवा इतर एखाद्या असहाय, स्मृतिजन्य भावनेची छटा नसून, फक्त समोरच्या मुंबईच्या दर्शनानें झालेला आनंद आणि आपल्या आप्तमित्राना भेटण्याचें औत्सुक्य एवढींच दिसत होतीं. फौजी आगबोट आडवी होऊन, बंदराच्या धक्क्याच्या जवळ जवळ येऊन

किनाऱ्याच्या कुशींत शिरत होती. आणि डेकच्या कठड्यावर हात ठेवून तुकाराम सदोबाच्या पलटणींतले सारे गडी नागर पडण्याची वाट पहात होते. त्या मनःस्थितींत समरांगणावर एकमेकाभोवती घातलेले मित्रस्नेहाचे विळखे आपोआप ढिले पडायला लागून प्रत्येक गड्याला एक प्रकारचा एकाकीपणा आला होता.

नागर पडला. बोटीवरून खालीं उतरण्याचा लाकडी जिना पडला आणि एक एक शिपाईगडी आपल्या मायभूमीवर पुन्हा पाय ठेऊ लागला. बंदरावर एक दोन गोरे अधिकारीच फक्त त्याचं स्वागत करायला उभे होते. तुकाराम सदोबा जसा जिन्यावरून खालीं उतरू लागला तसे त्याला एकदम आपण 'सर्व जगात खरोखरच अगदीं एकटे आहोत ' हा विचार तीव्रतेनें जाणवला. मुंबई शहराचे मोठे डाबरी रस्ते, त्यावरून उजव्या डाव्या बाजूंनीं वेगाने जाणाऱ्या मोटारी, रस्त्याच्या दुतर्फा असलेली झाडे, भव्य इमारती, या सर्व एकजिनसी शहरीं डौलाच्या दृश्यात तुकाराम सदोबाला भगतपूराला पोटात घेणाऱ्या मायभूमीची ओळख पटेना. तीन चार तासापूर्वी लांब समुद्रा-वरून त्याने मुंबईकडे पाहिलं तेव्हा तिच्या संदिग्ध स्वरूपातही किती आपु-लकी त्याला वाटली. आता त्याच मुंबईत पाय ठेवल्यावर त्याला बरोबर खांद्याला खांदा लावून लढलेल्या मित्राच्या आपुलकीनेही बिचकाविलें. त्याला कसली तरी विचित्र भीती वाटली. म्हणून जेव्हा त्याने वर मान करून पाहिलं तेव्हा त्याचं मन त्याला सोडून त्या फौजी आगबोटीच्या भोंग्यावर जाऊन बसलेलं त्याला दिसलं. तिथून ते अदृश्य मिस्किलपणानें तुकाराम सदोबाकडे टक लावून पहात होतं. तुकाराम सदोबाने त्याला रामराम केला आणि खिशातून एक सिगरेट काढून ती शिलगावली.

तुकाराम सदोबा भगतपूरच्या सदोबा शिवरामाचा मुलगा. १९१५ सालीं तो २३–२४ वर्षांचा ऐन ज्वानींतला उमदा तरुण होता. त्या

सालच्या मे महिन्यात तो सैन्यांत भरती झाला तो सदोबा शिवरामाला न कळत, आणि त्याच्या आईच्याही न कळतच. एक दिवस बाजाराला म्हणून पांच रुपये घेऊन तुकाराम गोठवडीला जायला निघाला तो संध्याकाळीं परत घरीं आला नाहीं. संध्याकाळची रात्र जसजशी व्हायला लागली तसतशी सदोबाला आणि तुकारामाच्या आईला काळजी वाटायला लागली. गोठवाडीहून परत येणाऱ्या प्रत्येक मनुष्याला सदोबा विचारीत होता 'तुक्याला पाहिलं का' म्हणून. शेवटीं सदोबाच मन अस्वस्थ झाल, आणि तो कृष्णेच्या घाटावर जाऊन एकटाच तुक्याची वाट पहात बसला. अंधार बराच झाला होता. समोरून येणारा जाणारा सदोबाला राम राम करीत कस काय म्हणून विचारी नि पुढे जाई. त्यापैकीं ज्याच्या बरोबरच्या ओझ्यावरून गोठवाडीची खूण पटत होती त्याना सदोबा 'तुक्या दिसला का ?' म्हणून विचारी. काहीं जण हो म्हणून सागत. काहीं जण नाही म्हणून सागत.

"काय सद्बा, एकल्याच बसल्याती घाटावर" गोठवडीहून येणाऱ्या पिलोबानें विचारलं.

"हा पिलूबा, जरा तुक्या गोठवडीस गेला हाय त्यो अजुनशान् परतला नाय. दिसला व्हता का तुमास्नी ?"

"दिसला व्हता तर. म्या हीं संत्रं इकत घेतलीं तथंच संत्राचं साल काढीत बसला व्हता कीं. राम राम बी केलान् मला त्यानं. म्या म्हटलं तुक्या गाडीवर यायचं कां तर म्हनूला नाई, मी जरा अंमळशानं त्या भावड्या बरूबर जाईन म्हून. पर अजून कसा नाई आला ?"

"यइल. गोष्टी माष्टी करत बसला असल झालं. तुक्या अन् भावड्या दोनी बी सारखीच योकच तऱ्हेची मानसं. यकदां गोष्टी अन् त्या बी कुस्तीच्या कराया लागले कीं त्येना ना दीस ना रात ! आपल्या म्हाताऱ्या मनाला लागते वाइच काळजी."

" मी बसतुया हथ तुमच्या सग, सदूबा. यकलच किति येळ बसनार. "

" अरे नई रे पिलूबा, मी काय लहान मुलगा हाय व्हय ! कां मला कुनी वाघ खाणार हाय ! तू जा घरला. पार्वती वाट पाहील इच्यारी. अरे मी काय जाइन अमळशान घरीं. अन् अजून गोठवाडीस्न येत्याती की लोक. नाय तर यइल तुक्या उशीरा. भावडू हायच त्येच्या बर्बर. तूं जा. रामराम. "

" राम राम, सदूबा. "

सदोबाने अशा रितीने बाह्यतः जरी फारशी काळजी दिसू दिली नाहीं तरी आतून त्याच्या मनाला विचारानी भंडावून सोडलं होतं. त्यातल्या त्यांत भावडूबरोबर तुक्या येणार ही विठोबाने दिलेली बातमी समाधानाची होती. सावळ्याची सगुणा, लालचंदचा भाऊ रखीमचंद, देवळातला सखाराम, अशी आणखी कांहीं मंडळी येऊन सदोबाला रामराम करून गेली. अंधार चांगलाच पडला होता. तरीही सदोबा तिथच घाटावर होता. इतक्यात त्याला हाक आली---

" सदूबा का ? राम राम जी. "

" कोन ? तुळजा व्हय ? "

" हा जी. लइ वकुत झाला घरीं येया गोठवडीस्नं. पर् जरा बैलाची जोडी पहायची व्हती. तुमी इथच बसलया एकल्यावानी इकूत्या अंधारांत ? "

" हां. वाइच आलुया अन् बसलुया. तुक्या यायचा हाय किनी गोठवडीस्नं. "

" अजून यायचा हाय ? रस्त्यानं तर आता कुनी बी दिसलं नाय. "

" त्या भावडूबर्बर येनार हाय तो, पिलूबा बोलल्याती. मी बी जरा बसन इथं अन् मंग जाइन. काय भाजी बिजी मिळाली गोठवडीस्नं ? "

" ह्ये वांगी अन् गोवाऱ्याची शेग जरा स्वस्ती मिळाली म्हून घेतलीया. घेवडा बघतला तर काय अवाच्या सवा दाम मागत्याती. "

" हा. आवंदाचा भाजीपाला जरा महागच हाय नव्हं का ? म्या बी तुक्याला म्हटल सस्ती मिळाली शेवग्याची शेग बिंग तर आन् नाय तर नको. "

" बरंय् सद्बा, मी जाऊं का येत्याती मजबर्‌बर ? तुक्या कोन जान कवा यइल ! चलताय ? घरीं वाट पाहतील मानस आमची. "

" तूं जा तुळजा. मी काय पहाटपर्यंत बसनार हाय व्हय इथ ! पर ह्यो मुलं यतील गोष्टी करीत जरा येळान. मी थाबन तोंवर तर थांबन नाय तर जाइन कीं घरला यकटा. जा तूं अन् रामबाला रामराम साग बर कां. "

तुळजा आपल्या घराला गेली. सदोबाने थोडा वेळ आणखी काढला. त्याचं मन अगदी बेचैन झालं होत. शेवटीं पिलोबानें सागितलं होत कीं तुक्या भावड्याबरोबर येणार म्हणून. तेव्हा निदान भावड्याच्या घरी तरी जाऊन पहावं कीं तो तरी घरीं आला आहे किंवा नाहीं असं सदोबान ठरविल आणि तो भावड्या गोधळ्याच्या घरीं गेला.

" रामराम तात्या, भावड्या आला का गोठवडीस्न ? " सदोबानें भावड्याच्या बापाला विचारल.

" राम राम सद्बा, अवो याकी वर जरा. आता यइलच भावड्या. "

सदोबा वर जाऊन ओसरीवर बसला आणि तात्या गोधळ्याने पुढें केलेली तपकीर घेऊ लागला. इतक्यांत सातारी वहाणा कर कर वाजवीत भावड्या आला. त्याला पाहाताच सदोबाने एक शिंक दिली आणि उत्सुक डोळ्यानीं विचारलं—

" अरे भावड्या. तुक्या आला का तुझ्यासंगं गोठवडीस्न ! कवा पासून वाट पाहतुया मी अन् घरची समदी मंडळी. "

" नइ बा. मी तुक्याला गोठवडींत पाह्यल पर माज्या बर्बर यायच बोलला नाहीं तो."

" कुठ अन् कवाशीक पाह्यल तुक्याला तू ? अरं अजून घरी नाय आला तो."

" त्यो अन् मी सरबत प्याया एका दुकानात गेलो व्हतो. अन् गप्पा बिप्पा मारीत व्हतो बाजाराच्या. अन् मी त्येला म्हटल बी कीं तुक्या घरीं कवा जाणार अन् कसा. तो गणू बी व्हता. म्हटल समदे मिळूनशान् जाऊं घरीं. पन् तुक्या म्हनला त्येला घरला लवकर जायचंय. अजून बी नाइ आला घरी ?"

त्या संभाषणानतर सदोबाला तिथे फार वेळ बसावसं वाटल नाहीं. तुक्याचा तपास त्यापुढें तेव्हा तरी करण सदोबाला अशक्य होत. म्हणून त्याने तात्या गोंधळ्याला आणि भावड्ला राम राम केला, आणि अंधाऱ्या रस्त्यानें तो आपल्या घरीं परत आला.

घरीं तुकारामाची आई आणि बायको एकमेकींना धीर देत सदोबाची वाटच पहात होत्या. त्या दोघींच्या मनात अनेक प्रकारचे विचार येऊन जात आणि त्याची तळमळ वाढवीत. तुक्याची आई पन्नाशीच्या घरात तर त्याची बायको साळुंकी अठरा वीस वर्षांची एवढीशी पोर. पण पोटांत चार महिन्याचा गोळा बाळगीत ती पोरच घरातलं नित्याचं काम उरकीत होती. आणि तें उरकत असतानाच सासूची समजूत घालीत होती. कीं त्यांचा मुलगा काहीं कुठें पळून जाणारा नाहीं कीं त्याला कुणी फूस लावून पळवील इतका तो अजाण नाहीं. जणू कांहीं पोटात वाढणाऱ्या इवल्याशा जिवानें साळुंकीच्या एकदर स्वभावातच थोडासा गंभीरपणा, सहसा विचलित न होणारा समजूतदारपणा आणला होता; आणि मातृपदाची थोर जबाबदारी

तिच्या अंगावर टाकता टाकता निसर्गानें त्या जबाबदारीला साजेशा प्रवृत्तीही तिच्यात प्रस्फुरित केल्या होत्या

" सासूबाई, ह्ये काद घेऊ का पिठल्यात घालाया ? अक्षी पाचोळा व्हाया झालाय ? "

" तुला ज्ये वाटल त्ये कर, साळुकी. मला नाय आता काई बी उमगत. ह्ये मानस बी बाइर गेल्याती त्येबी तकडच जाउनशान् बसल्याती. "

" इकत काय डोक त्रासून घ्येवं, सासूबाई. गोठवडी काय दूर हाय व्हय ? असतील कुनासग इकडल्या तिकडल्या गोष्टी करीत अन् यतील अंमळशानं. मामंजी आल्याती म्हंजे तुमी त्ये एवढी झुणकाभाकर खाऊनशान् पडा जरा. मी खाइन त्ये गोठवडीस्नं आल्यावर. "

असं म्हणत म्हणत साळुंकीनें संध्याकाळचा स्वयंपाक आटोपला होता. चुलीवर नुकत्याच काढलेल्या धारेच दूध ठेऊन चुलीपुढील स्वयपाक तिनें नीट आवरून ठेवला, आणि जमीन साफसूफ करून तिथे सासरा-सासूंच्या करता स्वच्छ घासून ठेवलेल्या दोन थाळ्या माडल्या. आणि तीही मग सदोबाची वाट पहात बसली. थोड्याच वेळात भावडू गोधळ्याकडून सदोबा परत आला. त्याच्या चेहेऱ्यावरून सासूसुनानीं ताडलं कीं तुक्याबद्दल काहीं नक्की तपास लागलेला नाही. सदोबाला एकटा पहातांच अर्थात् तुकारामाच्या आईच्या डोळ्यात पाणी आल. पण साळुंकीनें तिची समजूत घातली.

" असं काय येड्यावानी करत्याती, सासूबाई. मामंजी म्हनून्त्यानी कीं पिलबानं अन् भावडूनं दोघांनीं बी त्याना पाह्यलं अन् भावडूभावजी त्येंच्या-सग सरबत बी प्याल्याती. आतां नाइ तर थोड्या वेळानं यतील ते. लहान मुलापरमानं डोळ्याला पानी काय आनायचं."

" मला ठीक नइ लागत ग साळुंकी. माजा तुक्या इकती वर्से

झाल्याती यकदा बी समजायला लागल तसा रातचा बाहिर नाय राह्यला. सात वर्साचा व्हता तवा तो सांबल्यासंग बोरं खायाे गेला अन् असाच रात पडल्या-वर घरी आला. तवा त्येला समजाऊन सागितल घरी अधार पडायच्या अदु-गर याव म्हून. तवा पासन माझा तुक्या पुन्हा रात पडल्यावर बाहिर नाय राह्यलाय.'

"मी बी त्येच म्हनत्ये की. काइ काम बिम् निघालं असेल अन् यतील आता. अन् आज नाइ आले तर उद्या यतील पहाटला आवडा-मावशीकडे रात्रभर राहूनशान्. तुमी अन् मामजी चला बिगि बिगि अन् भाकर खाऊन घ्या बर."

सुनेच्या समजूतदार आग्रहाने सासूसासऱ्याची अस्वस्थ मने वळविलीं आणि त्यानी दोन घास तोंडात टाकले. त्याच जेवण सपल्यावर साळुकीनें थाळया व स्वैपाकाची भाडी घासून ठेवलीं. आणि स्वतःच्या पोटात दोन घांस घातले. त्यानतर त्या घरात फारस कुणी बोलल नाहीं. हळु हळू सर्व व्यवहार आटोपल्यावर सदोबाच्या घरातले मिण् मिण् दिवे मालवले आणि सासू, सासरा व सून अंगणात खाटा टाकून लवंडले. त्या रात्री त्या तिघापैकीं कुणाला आणि केव्हा झोंप लागली हे सागता येण अशक्य होतं.

रात्र सपली नि दिवस उजाडला. दुसरा दिवस उजाडला तसाच तिसरा दिवस उजाडला. सगळ्या भगतपूरातच नव्हे तर गोठवाडीपर्यंत तुका-राम बेपत्ता झाल्याची बातमी पसरली होती. निरानिराळे लोक निरनिराळ्या बातम्या सागत होते. पण निश्चित तपास असा सदोबास लागेना. शेवटी पधरा दिवसानी तुकारामाच एक पत्र सदोबाला आल आणि त्याला समजलं की तुकाराम सैन्यात दाखल झाला म्हणून. ही बातमी ऐकल्यावर पहिल्या उर्मीसरशीं साळुंकीला हुदका आला. पण मनोमय तिनें ईश्वराची प्रार्थना केली आणि मातृपदाच्या सुप्त पण नैसर्गीक जाणिवेनें तिला नकळत आधार

दिला. तुकारामाच्या आईला मात्र आपले दुःख आवरेना. बिचाऱ्या सदोबाची मतीही कुंठीत झाली, आणि त्याला एक प्रकारची असहायता, अगतिकता आली. त्याने एकदा साळुकीकडे बघितलं. मग मात्र त्याला आपल्या जबाबदारीची आणि कर्तव्याची जाणीव झाली.

"परमेसर आपल्या तुक्याला सभाळून घेईल," सदोबा आपल्या बायकोला म्हणाला, "पर आपन बी आपल्याला साभाळल पाह्यजे अन् तुक्याच नांव पुढं चालल इकती काळजी घेतली पाह्यजे."

१९१५ च्या मे महिन्यातील त्या दिवशीं तुकाराम गोठवडीकरिता म्हणून भगतपूराहून जो गेला तो १९१९ सालीच पुन्हा परत आला. मुबईहून शक्य तितक्या लवकर निघून तो भगतपूरच्या स्टेशनवर उतरला. तिथून दोन कोसावर असलेल्या आपल्या गावीं तुकाराम जेव्हा पोहोंचला तेव्हा सध्याकाळ सपून रात्र व्हायला लागली होती. कृष्णेच्या तीरावर तुकाराम पोहोचताच त्याला समोर पलीकडच्या तीरावर आधळा गोविंदशाहीर आणि त्याच्या भोंवतीं जमलेला, त्याचा पोवाडा ऐकण्यात तल्लीन झालेला तो भगतपूरच्या मराठमोळा दिसला. आधळ्या गोविदशाहीराचे खडे बोल डोळसपणानें कृष्णामाईच पाणी ओलाडून तुकारामाच्या कानावर सथपणें येत होते—

> ....."दोन्हो हातांचा मुजरा सांगा शिवाजी महाराजाला ॥ उदेभान मोंगल बारा हात जमीन उडाला । वचक सुरबाईचा दाविला मारा कैफाचा केला ॥ पन्नास वेढे पागोट्याचे पन्नास वेढे मंदिलाचे । बेंबी पावेतों चिरीत नेला । सुभेदार धरणीला लोटिला......."

तुकाराम एका पाषाणावर बसला आणि त्यानें खांद्यावरची खाकी पिशवी काढून बाजूला ठेवली. त्यानंतर आंधळ्या गोविंदशाहीराचे एकेक चौक ऐकत ऐकत त्यानें आपल्या एकट्याच असलेल्या उजव्या हातानें

बुटाचे बंद हळू हळू सोडले; आणि पोटऱ्याभोवतीच्या पट्ट्या व पायातले मोजे काढून ते पिशवीत टाकले. नंतर कृष्णेच गार, गोड पाणी ओंजळीत घेऊन तें त्याने आपल्या तोंडावर शिंपडल. त्यामुळें त्याला आलेला चालण्याचा शीण जरा कमी झाला, आणि त्याच्या चेहऱ्यावर जरा अधिक हुशारी दिसू लागली. एका अगदी तिऱ्हाइताच्या दृष्टीने तो समोरच्या दृश्याकडे पाहूं लागला. जवळच पायाला भिजवून जाणार कृष्णामाईच, झुळझुळणाऱ्या पाण्याच पात्र; त्या पलीकडे दगडी घाटाच्या पायऱ्या, तिथला तो मोठा वटवृक्ष; तो मराठमोळा; मशालीच्या प्रकाशातला आधळा गोविंद शाहीर; या सर्वांच्या पार्श्वभूमींत भगतपूरचीं मातीविटाची बैठीं अधारीं घर व त्यातून मधून मधून दिसणारा, अंधुक मिण् मिण् दिव्याचा धूसर प्रकाश; आणि शेवटीं या सर्वांवर मांडव धरणार निळ आकाश ! तुकारामाच्या कानावर शब्द आले—

. . "आले किल्ल्याचे पोटाला । पांच कर्णांचा बाजा केला ॥
अवाज महाराजानें घेतला । सुभेदार किल्ला घेऊन आला...."

तुकाराम स्वतःशीच थोडासा हंसला. त्याने आपल्या खाकी कोटाच्या खिशातून एक सिगारेटची पेटी काढली आणि त्यातील एक पांढरी शुभ्र सिगारेट शिलगावून तिचे दोन चार झुरके घेतले. इतक्यांत त्याचा विचार बदलला आणि त्याने ती सिगारेट विझवून टाकून दिली. नतर हळूच खिशातली सिगारेटची पेटी पुन्हा काढली. आणि ती सबधच्या सबंध कृष्णामाईच्या पात्रात फेंकून दिली. आपण काय करीत आहो याच त्याला तितकसं भान नव्हतं. किंचित् वर मान करून त्यानें पाहिलं तों त्याचं मन तुकाराम सदोबाला सोडून समोरच्या त्या भव्य वडाच्या एका पारंबीला लटकून झोंके घेत घेत त्याच्याकडे मिस्किलपणें पहात आहे असं त्याला दिसल. तुकाराम सदोबाने त्याच्याकडे टक लावून पाहिलं आणि तो पुन्हां थोडा स्वतःशीच

हंसला. मग त्यानें आपली विजार गुढग्यापर्यंत वर केली, खाकी पिशवी परत खाद्यावर टाकली आणि शेजारी पडलेले फौजी बूट आपल्या एकाकी उजव्या हातात घेऊन तो सथपणें कृष्णामाईच्या प्रवाहातून पलीकडे जाऊ लागला. शक्य तोवर पाणी तुडविण्याचा मोठा आवाज होऊं नये म्हणून तो एकेक पाय पाण्यातून अलगद काढून परत अलगद पात्राच्या वाळूंत रोवी. कृष्णामाईच पात्र तो जसजस तोडीत जाई तसतस समोरच भगतपूरच्या मराठमोळ्याच दृश्य अधिकाधिक स्पष्ट आकार धारण करीत होत. आणि आधळ्या गोविंदशाहीराचे खडे बोल अधिकाधिक मोठे होत होते.

"शूर मर्दाचा पोवाडा। शूर मर्दानें ऐकावा ॥ शिवाजीचे राज्यांत । ऐसा उमराव होणें नाहीं ॥ पोवाडा..."

कृष्णेच्या पात्रातल पाणी सपवून भगतपूरच्या तीरावरली कोरडी वाळू लागायला पाचसहा पावलाचच अतर होत तो पर्यंत तुकारामाकडे कुणाच लक्ष्य गेलं नव्हत. मग मात्र त्याच्या पायानी पाण्यात केलेला आवाज मोठ्यानें ऐकू आला, आणि अधारातून अस्पष्टपणे येणाऱ्या त्याच्या आकृतीने पोवाडा ऐकणाऱ्या मराठमोळ्याच लक्ष्य ताबडतोब वेधल.

..."गात्याला उद्घाण ऐकल्याला—"

आधळ्या गोविंदशाहीराचा आवाज थाबला. आणि स्तब्धपणें व किंचित् भीतियुक्त कुतूहलानें त्याच्याभोवती जमलेला सारा मराठमोळा तोंड फिरवून पाहू लागला. पैलतीराच्या अदृश्यातून एकाकी ऐलतीराला येणारी ही व्यक्ति कोण ह्या प्रश्नचिन्हाकित भासाभासानें तो सारा मराठमोळा निश्चल झाला. तुकाराम त्याच्या जवळ जवळ जाऊ लागला त्याबरोबर मशालीच्या तरल प्रकाशाने पाडलेल्या चित्रविचित्र मानवी सांवल्याच्या अद्भुत कवडस्यांच्या कडबोळ्यातून त्याची मूर्ती हलुंहलु निश्चितपणें आकाराला येऊ

लागली. आणि शेवटी त्या श्रोतृवृंदाच्या कडेला असलेला एकजण आश्चर्य आणि आनद याच्या मिश्रणात उद्गारला—

" अरे ह्यो सद्बाचा तुक्या ! "

सदोबाचा तुक्या म्हटल्याबरोबर त्या सर्व जमावाने " आँ, सद्बाचा तुक्या ? ", " अरे हो कीं सद्बाचा तुक्याच नव्हं का ! ", " सद्बाचा तुक्या खरच कीं ! " वगैरे विस्मयचकित हर्षाच्या गलबल्याने कृष्णामाईचा घाट दुमदुमुन टाकला. पिलोबा जवळच होता तो गडबडीनें म्हणाला—

" अरे सद्बा हाय कीं इथच आलेला इठू सग ! कुठ हाय तो ? अरं सद्बा, ए सद्बा ! अरं ह्यो तुक्या बघ की आलाय लढाईहून...! "

म्हाताऱ्या सदोबाने घाईघाईनें लहानग्या विठूला पुढयात घातल आणि तो जमावातून कसा बसा मार्ग काढीत तुक्याजवळ येऊन पोहोंचला. तुक्याला पहाताच त्याचे डोळे आश्चर्यानें विस्फारले. क्षणभर त्याचा आपल्या डोळ्यावर विश्वासच बसेना.

"ऑ आँ कोन् ? तुक्या...तुक्या..." डोळे तसेच विस्फारून म्हातारा सदोबा उद्गारला. आणि आश्चर्याची, गळा दाटून आणणारी पहिली उर्मी ओसरताच त्याला तुक्याची थोडी भीति वाटायला लागली. त्यामुळें तुक्याने जरी त्याच्या पाठीवर हात ठेवला तरी त्यानें आपल्या पितृप्रेमाच्या उमाळ्याला बाहेर पडूं दिल नाहीं. फक्त भीत भीत तो म्हणाला—

" हयो इठ्या, इठ्या–हो इठ्या. चार वरसाचा बहादूर हाय अन् पोवाडयाचा बी शोकीन. काय इठ्या, खर की नाय ? अर हयो तुझा बाप, जरा दंडवत कर अं."

तुक्यानें विठूला जवळ ओढण्याचा प्रयत्न केला. पण फक्त एका हाताचा खाकी पोषाखांतला हा कोण विचित्र प्राणी अस वाटून विठू बिचकून आपल्या आजोबाच्या अगाशींच चिकटून राहिला. त्याच वेळेला आधला

गोविंदशाहीर आपल्या भावाची मदत घेऊन, "अरे कुठ आहे तुक्या, मला आधळ्याला दिसत नाही पण मला त्याला हात लावू द्या रे !" असं म्हणत तुक्याजवळ येऊन ठेपला. मशालीच्या अंधुक प्रकाशातही त्याच्या खाचा झालेल्या डोळ्यात आतुरता भरून आलेली दिसत होती; आणि त्याच्या हृदयातून उचंबळून आलेल्या भावनानी त्याच्या चेहऱ्याची कातडी पुलकित होऊन थरथरू लागली होती. त्याने एकदम तुक्याला घट्ट आलिंगन दिलं आणि नेत्रसुखाची उणीव स्पर्शसुखाने भरून काढली. पण तें आलिंगन देता देता त्याचा उजवा हात तुक्याच्या पोकळपणे खाली लोंबणाऱ्या डाव्या बाही-भोवती गेला. ती बाही दाबली गेली. आधळ्या गोविंदशाहीराची मिठी चरकून क्षणभर तशीच राहिली. मग अधिकच घट्ट झाली.

आधळ्या गोविंदशाहीराने आपली मिठी सोडली आणि 'हऽऽ' म्हणून आपल्या सदऱ्याच्या डाव्या बाहीने आपले आधळे खाचाचे बुब्बुळी डोळे पुसले.

# — ३ —

पुढें मशाल; त्या मागें एका बाजूला म्हातारा सदोबा आणि विठू, मध्यें आधळा गोविंदशाहीर आणि त्याच्या दुसऱ्या बाजूला तुक्या; आणि त्याच्या खूप पाठीमागेपर्यंत व डाव्या व उजव्या हाताला पसरलेला भगतपूरचा लहान मोठा मराठमोळा; अशी ती मिरवणूक भगतपूरच्या निरुंद आणि फोफाट्याच्या रस्त्यातून मोठ्या गलबल्याने जात होती. ती म्हाताऱ्या सदोबाच्या घराला पोहोचण्याच्या अगोदरच तात्या गोधळ्याच्या लहान जिवाजीने आपले इतर धोंडू, सख्या, गोदी, लक्ष्मी, शकरभटाचा मध्या वगैरे शाळा सोबत्यांचे समवेत दुडकी मारून तुक्याच्या आगमनाची बातमी साळुकीला आणि साळुकीच्या सासूला, दम छाटीत छाटीत दिली होती. ती बातमी ऐकतांच त्या दोघी सासु–सुना गांगरून गेल्या. आनंदानें बावरून त्याना काय करावं आणि काय नाहीं हें सुचेना. त्या एकमेकींकडे हर्षनिर्भर दृष्टीनें आणि अनपेक्षित अत्यानंदाच्या गोड अगतिकतेनें पाहूं लागल्या. एकदम आठवण झाल्याप्रमाणे घाईघाईने सासू साळुंकीला म्हणाली—

" ह्यो ऐकला का गल्बला ! माजा तुक्या आत्ता यइल दाराशीं. अन् तूं अशी रिकामीच काय उभी राह्यलीया साळुकी ! अग म्या म्हातारीन उभं राह्यच. चल् लवकरशान् मला दहीभात दे आणून. इतक्या वर्सानं माजा

तुक्या परमेसरानं परत आनलाय त्यला ओवाळाया नको का. अन् बघत काय रायलीस !"

पण सदोबाच्या घरात दूध आणि दही भरपूर असल तरा भात नावाला सुद्धा मिळण अशक्य होत, आणि वात्सल्यमूढ सासूला त्याच भान नसलं तरी साळुकीला होत. अर्थात् प्रसगावधान ठेऊन तिने त्याचा उल्लेख न करता सासूला थोडे जोंधळे आणि दही एका वाटीत आणून दिले. आधळ्या गोविंद शाहीरासह भगतपूरच्या मराठमोळ्याने सदोबाची आणि तुक्याची त्याच्या घरापर्यंत सोबत केली. तुक्या दाराशी येताच त्याच्या आईनें त्याच्यावरून दही—जोंधळा ओवाळून बाहेर फेकून दिला, आणि आनदाच्या भरात हात न धुताच तुक्याला आलिगन दिल. साळुकीने जवळ आलेल्या विठूला उच-लून कडेवर घेतल आणि ती तशीच दाराशी हसत मुखाने उभी राहिली. तिने आणि तुक्याने एकमेकाच्या डोळ्याला डोळा भिडवला आणि ओसरा-वरच्या मिण् मिण् दिव्याच्या उजेडातही एकमेकाना आनदाचा आणि प्रेमाच्या पुनर्मीलनाचा इषारा दिला. साळुकीने विठूला एका कडेवरून उच-लून दुसऱ्या कडेवर घेतल आणि डोकीवरचा पदर नीट ओढला. तुक्याने आपली खाकी पिशवी खाद्यावरून काढून खाली ठेवली होती ती आणि त्याचे बूट व त्याची काबळ्यात बाधलेली पथारी साळुकीने हळू हळू एक एक आत घरात नेऊन ठेवली. भगतपूरचा मराठमोळा लढाईवरून परत सुखरूप आलेल्या आपल्या सवगड्याभोवती काही वेळ घुटमळून मग परत आपआपल्या घरीं जाण्याकरता पागला.

सदोबाच्या घराभोवती थोडयाच वेळात पुन्हा पूर्ववत् शातता नादूं लागली. तुक्या घरात गेला आणि त्याच्या पाठोपाठ म्हातारा सदोबाही गेला. म्हातारा सदोबा अजूनही थोडासा दबकतच होता. समुद्रापार जाऊन, निर-

निराळे देश आणि लोक पाहून आलेला आपला मुलगा. त्याच्याशीं कसं वागाव? म्हाताऱ्या सदोबाने बिचाऱ्याने कधीं मुबईसुद्धा पाहिली नव्हती. त्याच्या पर्यटनाचा किंवा देशाटनाचा परिघ म्हणजे गोठवडी आणि फार तर जिल्ह्याचं गाव! पण पुरुषाच्या मनाला बिचकवणाऱ्या या गोष्टींची भोळ्या स्त्रीमनाला दादही नसते. तुक्याच्या आईच्या भोळ्या मनाला तुक्या तो तुक्याच दिसत होता. तो चार देश फिरून आला म्हणून तिला त्याच्यासमोर संकोच वाटत नव्हता. तिच्या अजाण मातृहृदयावर त्यामुळें दडपण पडल नव्हत. म्हणून तिच्या आनंदाची उर्मी गोंधळलेल्या शब्दात आणि न कळत येणाऱ्या हुदक्यात व अश्रूत प्रगट व्हायला भीत नव्हती—

"काय तू तरी तुक्या! लढाईवर जायच व्हत तर सागूनशान तरी जायच. आमास्नी अगदीं चारी दिशा वेडयागत झालं. काय पन् तूं!" तुक्याची आई त्याला प्रेमाने दूषण देत म्हणाली. "पन परमेसाची किरपा मी जिवंत हाय तंवर तूं परत तरी आलास. आता कुठ जायचं झालं तर बाबा, सागून जात जा." अस म्हणून त्या माउलीने तुक्याला पुन्हा पोटाशीं धरलं.

तुक्यानें आपल्या एकाकी उजव्या हाताने आपले कपडे काढले आणि साळुंकीनें अथरलेल्या गोणपाटावर तो भिंतीला टेकून बसला. त्याची आई त्याच्यासमोर बसली आणि लहानग्या विठूला आधाराकरिता जवळ घेऊन सदोबा म्हातारा तुक्याच्या जवळ बसला. साळुंकी भिंतीला टेकून उभीच होती. एकदा शात दृष्टीनें आजूबाजूला पाहून तुक्या म्हणाला—

"ह्यो घर अन् समद्या गोष्टी जशा व्हत्या तशाच अगदीं हायती कीं! माय, तुज्या थाळ्या नि भाडी बी जणू पूर्वीसारखीच ताऱ्यावानी लखलखत्याती हं. म्या म्हटलं तूं म्हणशील मुलगा नाय तर काय करायचं थाळ्या न् भांडीकुडी घासून इतकी लख्ख!"

"थाळ्या घासल्याविना काय आमच बायकाच चालायच व्हय! पर म्यां नाइ हें घर इतक साफसूफ ठेवल बाबा. ह्यो समदा तुज्या बायकोचा कारभार हाय. तू गेल्यापासनं मला म्हातारीला अन् तुज्या बापाला ह्या मुलीन साभाळलय." तुक्याची आई म्हणाली. तिला दुजोरा देत देत सदोबा म्हातारा म्हणाला—

"खर हाय, तुक्या, ही म्हणत्ये त्ये. आम्हीं म्हातार पन् साळुंकीन धीर धरला अन् म्हूनशान् आम्हीं हाअे इथ अस हाअे. नाय तर कोन जान आमची काय दशा झाली असती. पर साळुंकीच्या रूपाने इठ्ठलरखुमाइ आली अन् आमची नि घराची लाज राखली बघ."

"पर माय, तू म्हातारी म्हून कोन म्हनतुय! चारपाच वर्सांनीं केंस थोडे पाढर झाल्याती पर तुक्याची माय म्हातारी नाय झाली अं!"

"कर बाबा, तू कर थट्टा. आता चार सामिदरापार जाऊन आलास तू नाय थट्टा करनार तर काय. पर डोळा भरून तुला देखल, आता म्हातारी झाली न् काही बी झाली तरी चिंता नाय."

"अन् दादा, तुमी बी काइ म्हातारं झालं नाहीं. मला तर ह्या घरात अन् मानसात इतकाबी फरक दिसत नाही. हं ऽ पर एका मानसात मात्र झालाय फरक अ ऽ—काय बर, हो तिचं कुंकू चार वरसापूर्वी लहान होत-पर आता केवढा मोठ्ठा टिळा झालाय् त्याचा!" तुक्यानें हसत हंसत साळुंकीला उद्देशून म्हटल. तिनेही त्याला त्याच्याच सुरात आणि लटक्या आढ्यतेने उत्तर दिल—

"झालाय् मोठ्ठा टिळा तर ह्यो कुकाचा. अन् का नाय व्हणार! त्येचा सौभाग्याचा धनी एवढा मोठा शिलेदार झालाय तर त्येलाबीं नको का मोठ्ठ व्हायला!"

तुक्या लढाईवर गेल्यापासून रोज नियमाने विठ्ठलाच्या देवळात जाणाऱ्या साळुकीने अतःप्रेरणेन आपणहून खरोखरच आपल कपाळावरच कुकू, सौभाग्याच चिन्ह म्हणून पूर्वीपेक्षा मुद्दाम खूप मोठ केल होतं. जणू काही तुक्याचं कमी जास्त करायला धजू पहाणाऱ्या अदृश्य शक्तींना ती 'खबरदार!' असा एक निःशब्द पतिव्रतेचा इशाराच त्या कुकवातून देत होती !

"अन् दुसरा एक फरक म्हणजे हा इठू ! काय इठू, आमास्नी वळखणार की नाय?" तुक्यान विठूला विचारल. पण त्याच्या प्रश्नाचं उत्तर साळुकीन दिल—

"वळखणार तर ! मोठा बड अन् बिलदार झालाय् तो. परवाच्या दिस ती शजारची तान्ही आपल्या घरी खेळाया आली व्हती तिला ह्यो इठू कस म्हणतो की थाब तान्ही, माझा दादा लढाईवर गेल हाय त्ये परत आलं म्हणजे मला बदूक मारायला शिकवनार हायती अन् मंग मी बी लढाईवर जाणार त्येंच्यासगं अन् फाड् फाड् बदुकात गोळीबार भरून समद्याना पिटाळून लावणार!"

"अर वा ! बहादूर हाय कीं इठ्या तू !"

"अन त्येन एक गानं बी पाठ केलय्. इठू, म्हणून दाखव त्ये लढाईच गानं."

विठूनें तो आदेश ऐकताच आपल्या आजोबाच्या कुशींत डोक लपविल. पण साळुंकीच्या आग्रहाने तो शेवटीं उभा राहून गाण म्हणायला तयार झाला. एकदा उभं राहिल्यावर मात्र शिशुसहज वृत्तीनें त्याचा सकोच नाहींसा झाला, आणि तो थाटात, ऐटींत हातवारे करून म्हणू लागला—

**आर्मी म्हणार ॥ ध्रु० ॥**

**शिपाइ दादा म्हणार । लढाइवर जाणार**

बंदुक धरणार । अन् बापसे बेटा सवाइ लढणार ॥ आम्ही म्हणार ॥

फोम् फुस् ठण् ठण्
लेफ् राट् खण् खण्

घेऊन येतो पलटण् । इठूजी सुभेदार ॥ आम्ही म्हणार ॥

विठू हे गाणं कुणाजवळ शिकला कुणास ठाऊक. पण साळुंकीने आणि भगतपूरच्या विठूच्या बडया दोस्तांनीं त्याच श्रेय दादू पोस्टमनला दिल होत. दादू पोस्टमन आठवड्यातून तीन वेळा भगतपूरला पत्रे आणि टपाल वाटायला यायचा. उन असो पाऊस असो दादू पोस्टमनच्या आठ-वडयातल्या तीन वाऱ्या भगतपूरच्या चुकल्या अस कधींही झाल नव्हत. म्हाताऱ्या सदोबाच्या घरात गेल्या तीन चार वर्षात दादू पोस्टमनला जवळ जवळ मानवी देहात अवतरलेल्या देवाची प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. त्याची ती ठेंगणी मूर्ती दुपारीं ३॥–४ च्या सुमारास लाबून येत असताना बघितली कीं म्हाताऱ्या सदोबाच्या घरातल वातावरण हटकून आतुरतेने चंचल व्हायचं. कमेरला 'व्हिलेज पोस्टमन'चा चामडयाचा पट्टा आणि डोक्याला ४५ डिग्रीचा काटकोन करून चढवलेली तपकिरी रगाची जुनाट टोपी असा दादू पोस्टमन विठूची आणि साळुंकीची थट्टा करण्याइतका वयस्क होता. आणि तुक्याच पत्र आहे किंवा नाहीं हे सूचित करण्याला त्याच्याजवळ दोन निरनिराळ्या पण ठराविक तऱ्हाचीं स्मितवदने होती! त्यापैकीं एका तऱ्हेच्या स्मितवदनाने तो सदोबाच्या सबध घराला हुरळायला लावायचा, तर दुसऱ्या तऱ्हेच्या स्मितवदनाने त्याच्या निराशेला सावरून धरायचा. पण म्हाताऱ्या सदोबाच्या घरांतील मोठ्या मंडळींना जरी दादू पोस्टमनचीं स्मित-वदनें निरनिराळे अर्थ सूचित करायचीं तरी विठूला मात्र त्याचा अर्थ एकच होता. तो म्हणजे दहा पंधरा मिनिटं हसणं खिदळणं, खाद्यावर चढणं, मौज आणि गाणं आणि पेपरमिंट!

दादू पोस्टमनने विठूला गाण्याचे शब्द जरी शिकवले तरी ते हातवारे करून ऐटींत म्हणण्याची विशिष्ट तऱ्हा विठूची स्वतःचीच होती; आणि ती त्याने शाळेत खंडू मास्तरानीं शिकवलेल्या, हातवारे करून म्हणायच्या 'कवाइतीच्या गाण्या'च्या पद्धतीवर बसविली होती. मात्र 'कवाइतीच्या गाण्या'तल्या किंचित् काटेकोर आणि यांत्रिक अशा हावभावांना रजा देऊन विठूनें त्या ऐवजीं अंतःस्फूर्त अशा स्वैर थाटाच नाटयगीत दादू पोस्टमनच्या शब्दातून निर्माण केल होतं. एकदा खंडू मास्तर आणि दादू पोस्ट मन एकाच वेळीं म्हाताऱ्या सदोबाच्या घरीं बसल असताना विठूने आपले स्वैर नाटयगीत मोठया उत्साहाने म्हणून दाखविल. तेव्हा आपल्या कवायतींच्या गाण्या'च्या थाटाची ही स्वैरपणे सुधारून काढलेली आवृत्ती बघून खंडू मास्तराना मोठ कौतुक वाटल. अन ते म्हणाले—

"शाबास विठू! अन् शाबास सदोबा! सदोबा, हा मुलगा तुमच नाव काढणार बरं का."

"नाव काढील तर! अन् तुक्या आला परत म्हणजे त्याला काय धन्य वाटेल." दादू पोस्टमन उद्गारला. आणि नंतर हळूंच मिस्किलपणें पुढें म्हणाला, "नांव काढीऌ विठू खरा, पण त्याला शिकवायला दादू पाहिजे, मास्तर. नाहींतर बिचाऱ्या विठूच्या नावाचा खेळखडोबा व्हायचा!"

दादू पोस्टमनच्या कोटीचा आनद खंडू मास्तरानींही मोकळ्या मनानें लुटला आणि ते हंसले. त्यानंतर म्हाताऱ्या सदोबानें सुरवात केली बोलायला—

"मोठा नाटकी हाय पोरगा, मास्तर. घरीबी इकती दाडगाई करतुया पन् आमची समद्यांची हसून हसून मुरकुडी वळतीया बगा रोज. तुक्या लहान व्हता तवा इकता ढंगदार नवता. आपल शाळाच काय लिवायच वाचायचं ते करायचा. अन् शाळा जशी सोडली तशी शेतावरलं काम करायचा. पर् ह्यो त्येचा पोर काय लिवल वाचल कोन जान!"

"जाऊ द्या हो सदोबा, लिहायच अन् वाचायच. आपले खड्ड मास्तर काही इतक्यात पेन्शनीत जात नाहींत. तोवर घेऊ द्या विठूला खेळून अन् मजा मारून. पुढे आहेच घसडपट्टी. काय मास्तर, खर कीं नाही ?"

"दादोबा म्हणतोय ते खर आहे सदोबा; घेऊ द्या विठूला खेळून सध्या. अन् शिवाय दादोबाने त्याला हसायच कस हे एकदा शिकवल म्हणज लिहायचं अन् वाचायच शिकायला किती वेळ लागणार."

पण खड्ड मास्तरानीं विठूबद्दल वर्तविलेल आशावादी भविष्य खरोखर कितपत खर होणार ह्याबद्दल सगळ्याच्याच मनात विठूनें शका उत्पन्न केली. शेजारच्या पहिल्या इयत्तेत शिकणाऱ्या लहान तान्हीच बोट धरून जोपर्यत विठू खड्ड मास्तराच्या शाळेत जात होता, तोपर्यत त्याबद्दल फारशी शंका कुणाला वाटली नाही. उलट विठूची शाळेला जाण्याची आणि बिगरींतलं 'कवाइतीच गाणं' म्हणण्याची हौस पाहून सर्वांना कौतुकच वाटत होतं. पण पहिल्या इयत्तेतला 'बे एके बे'चा पाढा, आणि 'एका आण्याला जर चार पेरू मिळतात तर एका रुपायात किती पेरू येतील' असले हिशेब जेव्हा त्याला पचविता येणं अवघड वाटूं लागलं तेव्हा मात्र खड्ड मास्तराना काळजी वाटा-यला लागली. शिवाय विठूच्या इतर सवयींनेंहि त्याना त्रास द्यायला सुरुवात केली होती. घरी साळुकीला एकही खोटा शब्द न सागणारा विठू खड्ड मास्तराना दर अर्ध्या तासागणिक बेलाशक गप्पा ठोकून देत असे. उनाड-पणात तर सगळ्या शाळेंत त्याने केव्हाच पहिला नबर पटकावला होता. घरच दूध प्यायचं आणि शाळेंत दाडगाई करून बिचाऱ्या खड्ड मास्तराना दमाय धरणी ठाय करून सोडायचं एवढंच विठूला माहीत. इतकं असूनही शाळेत खड्ड मास्तराचा जर कुणावर अत्यत लोभ असेल तर तो विठूवर: आणि याचं कारण म्हणजे दादू पोस्टमननें विठूला सागितलेल्या अनेक विनोदी कथा. ह्या कथाच्या स्वैरालापांवर विठू खड्ड मास्तराना आणि आपल्या सर्व

सवगड्याना खूष ठेवी. "एक व्हता म्हातारा गवंडी—" अशी विठूने गोष्टीच्या तासाला नुसती सुरुवात करण्याचा अवकाश की खड्डू मास्तर आणि सगळा वर्ग याच्यात हसू पिकायला लागलंच !

अशा रितीने अंकलिपीतील अकाकडे दुर्लक्ष करीत आणि लिपीची धूळपाटी भरीत विठूने जरी उनाडक्या आणि खोड्या ह्यात प्राविण्य सपादण्याचा निश्चय आरभला होता तरी काही विशिष्ट गोष्टीत मात्र तो डोकं चालवायचा. आणि त्याबद्दलचे सस्कार त्याच्या मनावर सूक्ष्म आणि खोल व्हायचे. खड्डू मास्तरानी शाळेत एकदा जेव्हा पहिल्या महायुद्धानतर एक विजयादिन साजरा केला तेव्हाचा प्रसग विठूच्या मनावर असाच तीव्र संस्कार करून गेला. त्या समारभाला खड्डू मास्तरानी तुक्याला मुद्दाम बोलावल होत. भगतपूरचे इतर मुख्य लोकही बोलाविले होते. पण विशेष म्हणजे अनायासे त्या तालुक्याचे मामलेदारसाहेब भगतपूरला येणार होते ती सधी साधून खड्डू मास्तरानी त्या समारंभाच अध्यक्षस्थान मामलेदारसाहेबाना दिल आणि त्याच्या हातोने सगळ्या मुलाना मिठाई वाटली. त्यावेळेस मामलेदारसाहेबांनी तुक्याबद्दल चार गौरवपूर्वक शब्द काढल. तुक्यानेहि लहानस भाषण करून लढाईच्या एक दोन गोष्टी सागितल्या. तो समारभ सपल्यावर तुक्याच बोट धरून विठू जेव्हा घरी परत येत होता तेव्हा त्याने तुक्याला नाना तऱ्हेचे प्रश्न विचारले. पचम जॉर्ज बादशहा की जय म्हणजे काय; लढाई कशाला म्हणतात; लढाईत खाकी कपडे का घालाव लागतात; पचम जॉर्ज बादशहा कुठे रहातो; तो आज भगतपूरला कशाला आला होता, मामलेदार म्हणजे पचम जॉर्ज बादशहा नाही तर मग मामलेदाराने मिठाई का वाटली, खड्डू मास्तरांनी इतकी मिठाई पंचम जॉर्ज बादशहाकडून कशी आणली; तुक्याला घोड्यावर बसता येतं का, लढाईत सगळ्याचे डावे हात कापून घेतात कां; पुन्हा लढाई केव्हा होईल. ती झाल्यावर पचम जॉर्ज बादशहा आणखी मिठाई

देईल का; खड्डू मास्तरानी दादू पोस्टमनला मिठाई दिली का, पचम जॉर्ज बादशहानें आणखी कोणाला मिठाई दिली; मामलेदार लढाईवर का गेला नाहीं; खंड्डू मास्तर लढाईवर गेले असते तर त्याना आणखी जास्त मिठाई मिळाली असती का; तुक्यानें लढाईवर पुष्कळ मिठाई खाल्ली का; मामलेदारानें सदोबाला अन् तुक्याला मिठाई का नाहीं दिली, मिठाई कशी करतात; घरीं आईला मिठाई का नाहीं पाठविली; बंदुकीची गोळी केवढी असते; तोफ म्हणजे काय; तुक्याने एक तोफ घरीं का नाही आणली, पंचम जॉर्ज बादशहाजवळ किती तोफा आहेत; हे आणि असेच अनेक प्रश्न सुचतील तसे पण गभीर जिज्ञासेनें छोटा विठू तुक्याला विचारीत होता. आणि तुक्याही त्याला समजेल अशा पद्धतीनें त्या प्रश्नांची उत्तरे देण्याचा प्रयत्न करीत होता.

तुक्याने दिलेल्या उत्तरानीं विठूच समाधान होत होतं किंवा नाहीं कुणास ठाऊक. पण हे प्रश्न आणि त्याचीं उत्तरें खंड्डूच्या मनात खेळत होतीं आणि त्याच्या स्वप्नाना रगवीत होतीं. दुसरा सुटीचा दिवस सपून तिसरा दिवस उजाडला, आणि शेजारच्या तान्हीबरोबर विठू शाळेला निघाला तरी त्याच्या मनात पचम जॉर्ज बादशहा, तोफा, मामलेदार, मिठाई याचेच विचार घोळत होते. शाळेंत खड्डू मास्तरानी विठूच्या वर्गाचा पहिला तास घेतला आणि विठूला थोडें अकगणित शिकवण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर त्याचा तास तान्हीच्या वर्गावर होता. आणि त्याच्या जोडीला शाळेवर फक्त एकच मदतनीस असल्यानें आणि त्यालाही चौथ्या इयत्तेवर तास असल्याने विठूच्या वर्गावर शिक्षकाच्या अभावीं स्वतःच अभ्यास करायची पाळी आली होती. खंड्डू मास्तरानीं विठूचा वर्ग सोडताना त्या वर्गाला सागितले कीं दुसऱ्या तासात त्यानीं मराठी पुस्तकातला सतरावा धडा वाचावा. त्याप्रमाणें सर्व वर्गातून बाजी प्रभूबद्दलच्या शब्दाच्या आणि वाक्यार्थाच्या संमिश्र गोंगाटाला सुरवात झाली. विठूनेही आपलें पुस्तक उघडलें आणि त्यांतला

सतरावा धडा इतरांप्रमाणेंच स्वतःशी। पण मोठ्याने वाचायला सुरवात केली.

"धडा सतरावा. बाजी प्रभू...शिवाजीमहाराज खिंडींतून पुढें निघून गेले. औरंगजेब बादशहाचे शिपाई त्याचा—त्याचा पाठलाग करीत होते. ते खिंडीपर्यंत—खिंडीपर्यंत येण्यापूर्वी—खिडीपर्यंत येण्यापूर्वी बाजी प्रभू आणि त्याच्याबरोबरचे निवडक—निवडक लोक—निवडक लोक जिवाला...जीव ...जी... व...जी...जी...व...जी...वा...

...बाजीशी चंपमकी जॉर्ज—मिठाईखा तान्ही—की जय—बादशहा शिलेदार शिर्के...शिरके...शिर...का—तुकाजी देव बाप्पा मोरया...बाजी-देव...बाप्पा...काप्पा...कापा डोक कापल मोरया...साडेतीन पचे खंडूमास्तर ...शेळीच्या मिठाई...ची तोफथाना...घट्ट धरून...थाना—तोबा—फातो —तोबा—मरा—मराठा—राठे माय—ठेमाय—कवा येईल माय. दादू जॉर्ज—हर हर म्हादेव...इचि भन् लगोट लावतुया...भन् धन्...धड गेला धडा...धड...शिर राह्यलं...धडा...धड राह्यलच...तोबा तोबा...बाबादशा-बासकी जय...तोफा नवे सत्ते—चाळीस—दादोबा मामलतदाराचं चाळीस पेपरमिंट...भाला बरची—तो बा कुणाचा—बा—खडूमास्तर अस्तर बुट्टी ...पिंग् चिंग् लिंच्...डावा पुढे करा हात...पिट्टाळ प्ररभू...काप हात डावा डोक...वाडा तुक्या डावा...हात्तिच्या घोडा...घोडा दौडा—दौड काय —दोडका—हात खा पेढा...पंचम खंडू...शिवाजी म्हाराजकीजय— ह्यो शिर—इठूच—शाबास बहाद्दर—जिवाजी घोरपडे—देवळात बसलय... तोफसरावर अन् देतोय पेंढा...ह्यो इठूचं धड हाय...इकता परकराम...इठू परप्रभूचा—जाशिर वार्जेनं...घोडाभर पान्यांत पेढाभर मिठाई दिली...अर इठ्या भाषण करतुया—तुया—महाराजाशिवकी जय...यक व्हता...म्हा—राज—तारा गवंडी...त्येच्या घरी व्हता बाजी परभू अन् त्येच्या...ये तान्ही पान्ही...गाय...शिवाजी म्हाराजनं मर्जीनं दिली इठूला...मिठूला...पोपट-

पंची...हिरवागार...दोन पैशाच तीन वागी तर मामलत्‌दाराच किती मास्तर ...लइ खिडूी मारली...और भागोगजेब लडका...तुकाजी तुमच्या ह्य इव्यान खिंडीत तान्ही राखली...मिठून...शिवाजी महाराज अन्‌ जॉर्ज बादशहा सुखरूप हाय लंडाई झालय...कुठ गेल हे घड...घडा ...घडा...मास्तर...बदूक घडा–हयेला डोक कापल.. पन्‌ मिठाई बक्षीस घ्ये...अक्षी आई...मार मिठी...आई...ढाई मि...खाकींत ठेव. मिठी शेळींचा पाला...शीवाजी म्हाराजॉर्ज की...शहाजीबास... गोटी खेळतुया मास्तर...ह्यो मामालातदार ..देवाच्यान्‌ मी घडा वाचला...घडा वाचला पन्‌ शिवाजी खिंडीतून निसटला...मायदादा उचल भवानी...तानीता...तोबा तोबा—इठूबा डोघ्या घ्योडा स्वारलाला गुंजीर्ज बदू खमास्त मस्तलेदार...उघड दारवो माय...शिवाजी म्हाराजे आल्याती आपल्या घरी...की जय...इठूला ह्यो खाकी फेटा बक्षिस...अन्‌ मोठी माय तवा मी बी खिड्डी मास्तरच्या खाद्यावर चढलो यकलापूर मी काय भितो व्हय...यका हातात त्वोफ घेतली अन्‌ शिवाजी म्हाराजे खिडी तून गेल्यावर मामलतदार तोबा करत आला...त्येला त्वोफ मारली...त्येन बी मला तोबाक मारली...अन्‌ डोक कापून काढलं परभूमाझ पर मी खिंडूी मास्तरच्या खाद्यावर व्हतो अन्‌ तसाच तल्वारीने सगळं मोमगलदार कापल.. तवा मोंमगलदार कसा म्हन्‌त्याती...इठू तूं परकराम करतुया तर ह्यो घे मिठाई...पर मी त्वोफ मारलीन्‌ म्हटल तुझी मिठाई परत घे पर खिंडीतून तुला जाभु देणार नाय...अन्‌ तुजी काय बिशाद...अन्‌ मग त्यो मोमगल-दार पळालं अन्‌ शिवार्जी माराज आल अन्‌ त्येंनी मला हये पेपरमिंट दिलं...मोठी माय पुन्हा कवा व्हइल लढाई अन्‌...पंचमजीवार्जे म्हारा-शहा मला यक त्वोफ देतलि काय?...मी पक्का त्येंना म्हणलों शिवाजी माराज मला एक गवंड्याची न्‌ एक धनगराची गोष्ट माहीत आहे...तवा मला खिडीमास्तरवर उभं करा अन्‌ गोळ्ळी घालून मी समदं मोंमलग

मारून टाकतो...पर त्येनी नाय म्हटलं अन् उद्या परोचा पाठ करून ये म्हणल्याली...अन् पेरू बी तानीने मला दिला...मोठी माय...तू यशील का माज्याबर्बर तोफवर बसून शिवॉर्ज महाराजाकडे...चार यकी चार... चार दुने बाबा...बा—रा—हात—रावनाला व्हते...पन् बाजी परभूला दोन यक यक व्हते—अन् दादाला यक...त्येनी यक इठूला दिलाय... मोठी माय बाजी परभू माज्याइकता मोठा व्हता का बाबाइकता...अन् मोठी माय खिंडी मनजे काय...अन् माय खिडीत बी कवाईत करतात...खडू मास्तर कवाइत नाय केली तर यक डोक कापतात...मोठी माय तू मला यक डोक देशील...का दोन...डावा हातर वर...उजवा...हात पुढे...यक दोन यक दोन वकाइत...राम राम—म्हाराज—जारज मोठी माय मी कवाई...मिठाई खाऊ...अन् बाजी परभूच डोक गेल्यावर त्येला मिठाई दिली ?—शिवार्जी माराजन...मोठी माय—तू हुरडा कवा...आननार— बाजी परभूंला डोक पाहिजे हुरडा खायला पाहयजे त्येला—अन् दादू म्हनला—शाबासीठू तू खिडींत डोक खुपसून बसला...अन् मोठी माय मी बाजी परभूंबर्बर हुरडा खाया याना जाऊं का—त्येन...शिवार्जीजंराजकी शाजय म्हटल–अन्–म्या बी शिर्वाजीजेजाकी म्हाराजय म्हटल अन्—मिठाई उद्या आनशील गोठवडीला–मोठी माय यक व्हता इठू त्येच नाव व्हतं बारार्जी परभू—बारार्जी परभूच यक डोक कापलं तरी त्यो लडाई करत व्हता—बारार्जी परभूच्या धड–डाने—धडा—धडा—"

"...वाचला का सगळ्यानीं ?"

"हो मास्तर,—" त्या सर्व वर्गाने गोगाटातच खडू मास्तराना उत्तर दिलं.

"छान. आता बाजी प्रभूची गोष्ट कोण सागणार ? पुस्तक बंद करून सांगायची बरं का."

'मी मास्तर,' 'मास्तर मी,' 'मास्तर मी सागतो' असे अनेक आवाज त्या वर्गाच्या खोलींत दुमदुमले. त्यात विठूचा आवाज नव्हता. खंडू मास्तरानीं सर्वांना गप्प रहायला सागितल.

"अशी गडबड नाही करायची. एका एका मुलाने एका एका वेळी बोलायचं. आता अगोदर पाच मिनिटं सर्व मुलानीं अगदी स्तब्ध बसायच. एक शब्दसुद्धा ऐकूं आला कोणाचा तर त्याला दहा पाढे लिहून आणायची शिक्षा. हं गप्प!"

सर्व मुलें खंडू मास्तरांच्या आज्ञेप्रमाणे अगदी गप्प बसली. पाच मिनिटानंतर खंडू मास्तर म्हणाले—

"विठू, इथे टेबलाजवळ ये. पुस्तक नको. अन् बाजी प्रभूची गोष्ट साग."

विठू जागेवरून उठला, खडू मास्तराच्या टेबलाजवळ जाऊन उभा राहिला आणि सतराव्या धड्यातील गोष्ट सागू लागला.

"मास्तर, यक किनी शिवाजी महाराजाचा सरदार व्हता. त्याच नाव मास्तर, होत बाजी परभू. एकदा किनी शिवाजी महाराज—शिवाजी म्हाराज एका खिंडीतून मास्तर,—"

# — ४ —

१९२० सालातला पाच वर्षांचा विठू १९३१–३२ साली सोळा सतरा वर्षांचा दणकट जवान झाला होता; १९१५ सालातला तेवीस चोवीस वर्षांचा तुक्या आता चाळिशीच्या घरांत आला होता; आणि तेव्हाची अठरा वीस वर्षांची तरणी पोर साळुकी पसतीसाव वर्ष सपवून छत्तीसाव्या वर्षांचं रुपेरी लेण चारसहा केसावर मिरवीत वयस्क व्हायला लागली होती. म्हातारा सदोबा सत्तर वर्षांचा झाला होता आणि त्याची मान पूर्वी इतक्या कणखरतेने आपलं ओझ उचलू शकत नव्हती. पण म्हातारा सदोबा तरीही मनाचा पूर्वीसारखाच खंबीर होता, म्हणून त्याची शेतकऱ्याची शक्ति टिकली होती. कारण, तुक्याची आई मधल्या एका प्लेगच्या साथींत म्हाताऱ्या सदोबाला या जगात एका दृष्टीने एकट ठेवून देवाघरीं गेली होती. आणि सोबतीला म्हणूनच कीं काय विठूच्या धाकट्या बहिणीलाही तिनें त्याच साथींत आपल्या बरोबर नेलं होतं. म्हाताऱ्या सदोबाच्या घराच्या चार भिंतींच्या आत झालेल्या स्थित्यंतराच्या प्रतिमा कमी अधिक फरकानें भगत-पूरच्या इतर घरांतूनही उमटल्या होत्या. गोठवडीहून आठवड्यातल्या तीन दिवशीं भगतपूरास येऊन टपाल वाटणारा दादू पोस्टमन आतां सेवानिवृत्त झाला होता. आणि मधून मधून तो भगतपूरला एकादी फेरी जरी घालीत

असला तरी आता टपाल वाटीत नव्हता. शाळेतल्या खड्डूमास्तराची बदली भगतपूराहून गोठवाडीला झाली होती. रामजी पाटील आणि शकरभटजी प्लेगाच्या साथीत तुक्याच्या आईबरोबरच बळी पडले होते, तर तात्या गोंधळी वयाच्या पासष्ठाव्या वर्षी आणि सगुणाबाई वयाच्या बासष्ठाव्या वर्षी वार्धक्याने इहलोक सोडून गेले होते. गुलाबवाण्याच दुकान मूळच्या घरातून शेजारच्या त्याने स्वतः बाधलेल्या दगडी घरात गेल होतं. तात्या गोंधळी वारल्यावर त्याच्या मुलानें म्हणजे भावडू गोंधळ्याने आपला वडिलोपार्जित जमीन जुमला विकून टाकला होता आणि तो मुबईला कापडाच्या गिरणीत काम करायला राहिला होता. विठोबाच्या देवळात शकरभटजीच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा मधु देवपूजेच पहात होता. मैनेच लग्न गणूपाड्रशीं शेवटी होऊन तिला एक मुलगी झाली होती. म्हाताऱ्या सदोबाच्या शेजारची तान्ही जिल्हयाच्या गावी एका पोलीस शिपायाला दिली होती. धोंडू, सख्या, गोदी आता तरुण मडळी होऊन शेतातल्या आणि घरातल्या कामाचा आणि मेहनतीचा बोजा स्वतत्रपणे आणि अधिकारी रीतीने उचलू लागलीं होती. सख्याने भावडू गोंधळ्याची जमीन घेऊन तिच्या मशागतीकरिता एक नवी बैल जोडी विकत घेतली होती, तर तुळजेने आपल्या दोन म्हशीच्या चार म्हशी केल्या होत्या. म्हाताऱ्या सदोबाने मात्र केवळ विठूच्या हौशीखातर घेतलेल्या शेळींना केव्हाच रजा दिली होती.

भगतपूरच्या निरनिराळ्या चार भितीच्या आत घडलेल्या फरकाबरोबरच त्याच्या सकीर्ण जीवनातही बाह्य जगाचे प्रतिध्वनि थोडेफार उमटलेच होते. पहिल महायुद्ध सपल्यानंतर आलेल्या महागाईच्या लोंढ्याबरोबर भगतपूरचीं माती विटाचीं घरं थोडीं हादरली. त्यानतर घसरलेल्या बाजारभावाची आचही भगतपूरच्या घराना चाटून गेली. पण पोटाला दाणा आणि अंगाला वस्त्र त्याला मिळत राहिल, गोठवडीचा बाजार अजून जरी भगतपूरच्या मराठ-

मोळ्याला पायानेंच करावा लागत होता तरी कृष्णेच्या पलीकडून जाणाऱ्या मोठ्या डाबरी रस्त्यावर थोडावेळ उभ राहिल म्हणजे 'पालकर मोटार सर्व्हिस'च्या लॉरीसारख्या मोटारींतून किंवा बसमधून जिल्ह्याच्या गावाला सहा आण्यात प्रवास करता यायला लागला होता. गोठवाडीपासून चार कोसावर असलेल्या शिंगडे गावात साखरेचा नवा कारखाना सुरू होऊन भोवताली उसाची लागवड जोरात होऊ लागली होती. भावडू गोधळी एकदा मुबईहून भगतपूरला आला होता तेव्हा त्याने पुणे मुबईमधली आगगाडी कोळशाच्या विजिना ऐवजी विलेक्ट्रिक सिटीनें आता कशी चालते याच रसभरित वर्णन केल होत. ती आगगाडी पहाण्याकरिता म्हणून गेलेले भगतपूरचे पाच पचवीस जवान शेवटीं भावड्या गोधळ्याच्या गिरणीत समरस झाले होते. गुलाब वाण्याच्या वाढलेल्या दुकानात विड्याच्या बडलापासून योग्य आणि साजेल अशा अतरावर हत्तीछाप सिगरेट दिसायला लागली होती. विठोबाच्या देवळाच्या शिखरावर फडफडणाऱ्या एकाकी भगव्या निशाणाला आता दुसर एक तितक्याच स्वैर ऐटीने फडफडणार भगव्या, पाढऱ्या आणि हिरव्या रंगाचे आडवे पट्टे असलेल अस तिरगी निशाण साथ देत होतं. रामजी पाटलाचा भिकू आणि यमुनाकाकूचा मोरू सुटीत भगतपूरला आले म्हणजे भगतपूरच्या वातावरणात दोन चार इग्रजी शब्द तोऱ्यानें तरळू लागले होते. त्यातच भगतपूरच्या स्वच्छ पाढऱ्या खादीचा पोषाख करणारा शामराव सूत कातता कातता तुरुगाचे पडसाद घुमवीत होता, तर तितक्याच स्वच्छ खादीचा पोषाख करणारा यशवत रजेवर आला म्हणजे आपल्या 'साहेबा' बरोबर केलेल्या फिरतीबद्दलच्या गप्पा मिसळीत होता. गुलाब वाण्याच्या दुकानाच्या एका कोपऱ्यातून भगतपूर-मधली पहिली बायसिकल् डोकावून पहात होती. पण आता तिच्या नाविन्याचा बहर ओसरू लागला होता. भगतपूरच्या मराठमोळ्याच्या शिळो-

पाच्या गप्पाचा व नागरणी—पेरणीच्या वर्तमानाचा. कानोसा घेत देवळातील विठोबारखुमाई आपल्या विटेवर उभ राहूनही 'विलेक्शन'ची मोडकी तोडकी भाषा समजून घ्यायला शिकत होते. गोठवडीच्या मारुतीच्या जत्रेतील कुस्त्याची जितक्या उत्सुकतेने भगतपूरचा मराठमोळा वाट पहात असे तितक्याच उत्सुकतेने जिल्ह्याच्या गावच्या 'सिनेमा'ला जाण्याच्या संधीचीहि तो मार्ग-प्रतिक्षा मधून मधून करायला लागला होता. पूर्वीची खड्‌ मास्तराची शाळा आता एका लहानशा पण स्वच्छ अशा स्वतंत्र इमारतींत गेली होती, तर पत्र्याच्या मोडक्या तोडक्या ठिकठिकाणीं गजलेल्या सार्वजनिक सडासाची गलिच्छ घाण भगतपूरच्या ईशान्य दिशेला आहे असं वासाच्या अनुरोधाने ताडता आल असत !

बाहेरच्या जगातील घडामोडीचे पडसाद आणि वैयक्तिक जीवनातले आरोहावरोह याच्या समिश्र स्वरानी भगतपूरच्या मराठमोळ्याचं जीवनसंगीत जरी याप्रमाणे बारातेरा वर्षाच्या अवधीत थोड फार बदलत गेलं होत तरी त्याच्या ठेक्याचा लय पूर्वीसारखाच होता. पूर्वी ज्यानें भगतपूर बाघितल होतं अशा एकाद्या मुशाफिरानें भगतपूरला जर पुन्हा या बारा तेरा वर्षानंतर भेट दिली असती, तर त्या खेडगावाच्या बाह्य स्वरूपात त्याला विशेष फरक झालेला दिसला नसता. रस्त्यांतल्या फोफाव्यात कालमर्यादाच्या रेषा केव्हाच पुसून गेल्या होत्या. मातीविटाच्या घरावर धुळीचा क्वचित् एकादा थर अधिक बसला असेल एवढेंच ! कृष्णामाईच्या घाटावर पूर्वी आईबहिणीबरो-बर येऊन त्याचं धुण चालू असताना पाण्यांत पाय सोडून बसणारी किंवा उथळ पात्रात मजेनें डुबणारी जी छोटी मडळी होती त्यापैकीं काहींचे चेहेरे त्या मुशाफिराला बारा वर्षानंतर त्याच कृष्णामाईच्या घाटावर लुगडी किंवा धोतरं आपटून धुणाऱ्या काहीं मोठ्या मंडळींत सहज हुडकून काढतां आले असते. विठोबाच्या देवळाच्या ओव्यावर उन्हाळ्याच्या दिवसात जीभ काढून

हाय् हाय् करीत लवडलेलं काळ कुत्र आता जरी तिथं नसल तरी त्याचीच हडकुळी प्रजा भगतपूरच्या रस्त्यात कुठ तरी पडलेलीं उष्टीं उकरताना सहज दृष्टीला पडली असती. दुधाच्या भावात जरी थोडा फरक पडला असला तरी रामप्रहरीं निरनिराळ्या गोठ्यातून येणाऱ्या दुधाच्या धाराच्या पूर्वीच्या आवाजात आणि आजच्या आवाजात काय फरक आहे सागण कठीण झाल असतं !

बारा तेरा वर्षापूर्वीच्या आणि आजच्या भगतपूरच्या स्वरूपाला एका बाजूने कृष्णेच्या घाटावरचा वड आणि आधळ्या गोविंदशाहीराचा खड्या सुरातला पोवाडा, व दुसऱ्या बाजूने विठोबाच्या देवळातील घटाचे निनाद ही मात्र परस्परपूरक अशा रीतीनें छेदून जात होतीं. त्याच्या साध्य संगीतात जिल्हयाच्या गावाला जाणाऱ्या ‘पालघर मोटार सर्व्हिस’च्या मोटारीचा हॉर्न ऐकू आला असताच तर तो अगदीं लाबून आणि तोहि कमालीच्या अस्पष्ट रूपात. शेवटीं बारा तेरा वर्षानतर भगतपूरला पुनर्भेट देणाऱ्या आपल्या मुशाफिराने जर शेतावरून बैलाची जोडी पुढे घालून घरीं परत येणाऱ्या एकाद्या मराठा गड्याला विचारल असतं की, ‘काय राव, गावची काय हकीगत आहे ?’ तर त्याने न कळत एवढंच उत्तर दिलं असत, ‘ठीक आहे राव, पर अवदा मेघराज काय करल त्ये खरं !’

पण भगतपूरच्या नाशिबाची खरी रेषा उमटविली जात होती ती २००–२५० मैल लाब असलेल्या मुंबई शहराच्या एका भव्य इमारतींतील ऐसपैस आणि प्रशात दालनांत. मुंबईच्या उकाडा करणाऱ्या ऊष्णतेपासून रक्षण करण्याकरिता त्या दालनांतली हवा यत्राने खेळवून थंड ठेवण्यात आली होती. ते दालन जरी खूप मोठ होत तरी त्यात सामानसुमान फारसं नव्हतं. मध्यभागीं फक्त एक लाब स्वच्छ पॉलिश केलेलं टेबल ठेवलं असून त्याच्या शिरोभागीं एक खुर्ची आणि दोन्ही बाजूला पांच पांच खुर्च्या मांडल्या होत्या. प्रत्येक खुर्चीसमोर टेबलावर कागद, पेन्सिली, दोन टांक, दौत,

ब्लॉटिंग पेपर अशीं लिहिण्याची उपकरण व्यवस्थित रीतीनें माडली असून कागदांवर काचेचीं वजन होतीं. दालनातल्या विजेनें चालणाऱ्या मोठ्या घड्याळात चारचे ठोके नुकतेच पडून गेले होते.

थोड्या वेळातच दालनाच दार उघडलं आणि लखमीदास लालचंद आणि नवलराय बचुभाई आत आले. ‘एम्. एच्. ई.’ किंवा ‘मराठा हायड्रो इलेक्ट्रिक्स’ या संस्थेच्या चालकमंडळाच्या सब्कमिटीची आजची सभा विशेष महत्त्वाची होणार हे ओळखून नेहमी उशीरा येणारे हे दोघे चालक आज वेळेच्याही अगोदरच येऊन दाखल झाले होते. हळू हळू इतर सभासदही एक एक येऊ लागले. सर फ्रामजी आणि अब्दुल हुसेनभाई; विठ्ठलदास नानकचंद, मचरजी किकाभाई, रुस्तुमजी कावसजी आणि सर अन्वरुल्ला हे त्या त्या क्रमाने येऊन जमेल त्या खुर्चीवर बसले.

“—अरे विठ्ठलदास, तमारी शेवरोलेट वेचवानी छे ना? मारी पास एक गिऱ्हाइक आवेलो छे.” रुस्तुमजी कावसजी म्हणाले.

“हा रुस्तुम काका, वेचवानी तो छे. तमारा गिऱ्हाईक कोन छे? अने केटलेतक लइ सकसे एवन्?”

“अरे मारो सगोवालोच छे. एवन कलकत्याथी हैंया आवेलो अने एनी पोतानी गाडी एने वेची नाखेली कलकत्तामा. अने एवन मारी गाडी ड्राइव्ह करेच. पन् जो एवननें सारी गाडी मळी जाय तो सवती सरस...”

तिकडे सर फ्रामजी, सर अन्वरुल्ला आणि मंचरजी किकाभाई शनिवारच्या रेसेसबद्दल बोलत होते—

“विक्टरी अवे नथी फॉर्ममा. अने वडोदराना स्टेबलनी तो तमे वातच ना करो” मंचरजी म्हणाले.

“हू रमस तो विन्पर एक हजार. गम्मे ते थाय पर मारा घोडा आवूच जोइये.” सर फ्रामजी उद्गारले.

" सर फ्रामजी ए डार्बी टेबलनो सू वाधो निकालेल छे ? " मारा ऑफिसमा दिवाणजी केहताथा के टर्फन् कइ नवो कायदो थवानो छे के टेबलनी रेस..."

सर अन्वरुल्लाचे वाक्य पुरे होण्यापूर्वीच घड्याळात साडेचार वाजले आणि दालनाचे दार उघडून सर शंकर सेवकलाल आणि मि. क्लेमंट चाइल्ड आत आले. सर शंकर सेवकलाल एम्. एच्. ई. च्या कृष्णा प्रॉजेक्ट सब् कमिटीचे अध्यक्ष असल्यानें ते टेबलाच्या शिरोभागी असलेल्या खुर्चीवर बसले आणि त्याच्या उजव्या हाताला कृष्णा प्रॉजेक्टचे मुख्य इंजिनिअरिंग सल्लागार अमेरिकन मि. चाइल्ड बसले. कामाला सुरवात सर शंकर यानीं अस्सल आणि अस्खलित इंग्रजीत केली.

" सभ्य गृहस्थ हो, आपल्या कंपनीच्या चालकमंडळानें कृष्णा प्रॉजेक्टवर रिपोर्ट तयार करायला आपली ही सब् कमिटी नेमली. आपल्या वतीनें आपले सल्लागार मि. चाइल्ड यानी लिहिलेल्या रिपोर्टाचा तर्जुमा तुम्हीं सर्वांनी पाहिलाच आहे. मि. चाइल्ड याच्या मते कृष्णा प्रॉजेक्टची स्कीम भांडवल गुंतविण्यास अत्यंत फायदेशीर कशी आहे हे त्यानी आपल्या रिपोर्टाच्या तर्जुम्यात आकड्यासह दाखविले आहे. तेव्हा ह्या रिपोर्टाला मान्यता देण्यापूर्वी आपणास काहीं मुद्दे मांडावयाचे असल्यास ते मांडावे."

सर शंकरांनीं अशा रीतीने प्रस्ताव केल्यावर जमलेल्या सभासदांनी आपआपले मुद्दे मांडले. प्रथम सर फ्रामजी म्हणाले की–

" एकंदर वस्तुस्थितीचा विचार करतां आपल्याला यात फारच मोठं भांडवल गुंतवावं लागणार आहे. त्या दृष्टीनें पहाता आणखी कांहीं वर्षे हा प्रॉजेक्ट लांबणीवर टाकला तर आरंभींचा खर्च कमी होईल असं–"

" मला नाहीं तसं वाटत," लखमीदास लालचंद उद्गारले. " सध्या गोल्ड स्टॅंडर्डचा बोजवारा होत आहे. आपल्याला लागणारी मशिनरी कमी

खर्चांत मिळणार आहे असे गृहीत धरायला हरकत नाहीं. एकदरींत सगळीकडे मदी झाल्यानें बेकारीचाही फायदा मिळून आपल्याला मजुरीचा खर्च कमी येणार आहे. हा प्रॉजेक्ट पुढे ढकलला तर हे फायदे पुढें मिळतीलच असें नाहीं."

"माझी मुख्य शका—" सर अन्वरुल्ला म्हणाले, "या भाडवलावर उत्पन्न किती सुटेल याबद्दलची आहे. त्याचा अदाज करताना रिपोर्टात पुष्कळ गोष्टी गृहीत धरल्या आहेत. त्या कदाचित् पोकळ आशा ठरण्याचा संभव आहे. जितकी विजेची शक्ति तयार करण आपल्याला शक्य होईल तितकी सबध तयार झाली नाही किंवा विकली गेली नाही तर आपण तोट्यांत सापडूं."

"पण सरकारने आणि रेल्वे कंपन्यानी त्यातला काहीं भाग घेण्याचं अगदीं आश्वासन दिल नसल तरी ते घेतील यात मुळीच शका नाहीं," मि. चाइल्ड म्हणाले. "कारण तो घेणं त्याच्या निःसंशय फायद्याच आहे."

"पण सर अन्वरुल्लाचा रोख सरकार आणि रेल्वे विकत घेतील त्या भागाच्या अदाजावर नाही. पण निरनिराळे उद्योगधदे आणि कारखाने सुरू होऊन त्यांना लागणाऱ्या विजेच्या शक्तीचा जो अदाज बसविला आहे त्यावर आहे. हे उद्योगधंदे आणि कारखाने आपल्याला काढता येणार नाहींत. इतर लोक ते केव्हा आणि किती प्रमाणात काढतील याबद्दल आपला अंदाज चुकीचाहि ठरेल. अर्थात मला हे कबूल आहे कीं स्वस्त दरानें विजेची शक्ति मिळण्याची अपेक्षा वाढतांच निरनिराळे धदे कारखाने सुरू करण्याच्या कल्पनेला प्रोत्साहन मिळेल."

"त्या बाबतींत मी अगदी कमींत कमी अंदाज धरला आहे." मे. चाइल्ड उद्गारले.

"शिवाय, दुसरी गोष्ट म्हणजे," सर फ्रामजी म्हणाले, "आस-पासच्या गांवांत घरगुती सोयीकारितां विकत घेतली जाईल म्हणून जो विजेचा

अदाज केला आहे त्यातही जरा दूरदृष्टीने आणि आपल्या समाजाच्या रीती-रिवाजाच्या दृष्टीने पाहिल पाहिजे. अमेरिकेप्रमाणे दर घरातून विजेच्या चुली वगैरे गोष्टी एकदम प्रचलित होतील अस मानणं जरा धोक्याच आहे."

"आणखी आपल्या रिपोर्टात जमीन विकत घेण्याबद्दल लिहिल आहे त्याबद्दलही पुन्हा विचार करायला हवा. कोणत्या भावाने आपण जमिनी विकत घेणार हें आपण ठरविल तरी हे मराठे शेतकरी आपल्या जमिनी तेवढ्याला विकतील का? त्याना व्यापार वगैरे काही समजत नाही," विठ्ठलदास नानकचद म्हणाला, "त्याना फक्त शेती पाहिजे असते. आणि आपल्या अदाजात त्यावर जी रक्कम धरली आहे ती अगोदरच फार आहे अस मला वाटतं."

"ती मुद्दाम धरली आहे—कारण तितकं मार्जिन असलेल बर." मि. चाइल्ड उत्तरले.

"हा, पण आपण कमींतकमी दरात जमिन विकत घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कदाचित् सर शकर सेवकलाल आणि सर फ्रामजी आणि सर अन्वरुल्ला यानीं सरकारकडे जाऊन..."

अशी एम्. एच्. ई. च्या त्या सब् कमिटीत बराच वेळ कृष्णा प्रॉजेक्टवरील मि. चाइल्ड याच्या रिपोर्टाची खूप चर्चा झाली. शेवटीं सहा विरुद्ध दोन मतांनीं रिपोर्टाचा तर्जुमा मंजूर झाला. नतर तो एम्. एच्. ई. च्या सर्व चालकांपुढें माडला गेला. त्यांची खात्री पटली कीं भांडवल ह्या प्रॉजेक्टमध्यें गुंतवणें फायदेशीर आहे. हा प्रॉजेक्ट पूर्ण झाला म्हणजे जें उत्पन्न येईल तें अंदाजाच्या निम्मे असलं तरी त्यातून खर्चवेच आणि भाडवलावर पाच टक्के वजा करतां उरलेल्या शिलकेतून वीस वर्षांत सारं भाडवल भरून येईल. मशनिरीचं डिप्रिसिएशन वगैरे जमेला धरूनही वीस वर्षांनंतर एम्. एच्. ई. ला विपुल फायदा होईल यात शंका उरली नसल्यानें

सर्व चालकांनी मि. चाइल्ड याचा सर्व्हे आणि रिपोर्ट बहुमताने मान्य केला आणि कृष्णा प्रॉजेक्टच्या सब् कमिटीला पुढील सर्व योजना आखण्याचे आणि पार पाडण्याचे सर्व अधिकार एकमताने दिले.

चालकमंडळाच्या अनुज्ञेनुसार कृष्णा प्रॉजेक्ट सब् कमिटीनें लगेच आपल्या कार्याची दिशा आखून त्याप्रमाणें कामाला सुरवात केली. मि. चाइल्ड आणि नवलराय बचुभाई व सर अन्वरुल्ला हे यंत्रसामग्री खरेदी करण्याकरिता यूरोप–अमेरिकेकडे रवाना झाले. इकडे सर शंकर सेवकलाल प्रभृतीनी सरकारच्या प्रतिनिधीशी विचारविनिमय करून त्याची परवानगी, जमिनी विकत घेणें, त्याच्या शेतकरी मालकाना भरपाई देणे वगैरे महत्त्वाच्या गोष्टींना हात घातला. त्याबरोबरच कृष्णा प्रॉजेक्टच्या उपयुक्ततेचा प्रचार करण्यासही त्यानीं सुरवात केली. कृष्णा प्रॉजेक्टपासून उपलब्ध होणारी विजेची शक्ती उद्योगधंदे, शेती वगैरेंना कशी उपकारक ठरेल; त्यानें एकदर आर्थिक दृष्ट्या लोकांची कशी प्रगति होईल; वैयक्तिक आणि कौटुंबिक जीवनात स्वच्छता, उजेड, सुखसोयींची समृद्धि याचा कसा अपूर्व लाभ होईल; या सर्वांचे सुंदर चित्र निरनिराळ्या जाहिरात तंत्रानीं कृष्णा प्रॉजेक्टच्या भागातील लोकाच्या मनावर बिंबविण्याचा सतत उद्योग सुरू झाला. आणि त्याबरोबरच जमिनींबद्दल मिळणारी रास्त भरपाई आणि आसपासच्या प्रदेशाचं भावी आर्थिक वैभव याच्या आकर्षणाने व आमिषाने त्या लोकाचे अनुकूल सहकार्य मिळविण्याची खबरदारीहि घेण्यात आली.

कृष्णा प्रॉजेक्टमध्ये तीन चार प्रवाहांचा मुख्यतः समावेश होणार होता. त्यातला प्रमुख प्रवाह म्हणजे कृष्णेच्या पात्रांतल्या पाण्याचा आणि दुय्यम प्रवाह म्हणजे भगतपूरच्या डाव्या बाजूने येणारा मोठा ओढा. शिवाय आणखी भगतपूरपासून वर उगमाच्या दिशेला कृष्णेला मिळणाऱ्या एक दोन लहान नद्यांची पात्रं असे इतर उपप्रवाह. मुख्य धरण भगतपूरपासून खालीं

अर्ध्या मैलावर आखल होत. ज्या मर्यादानीं धरणाच पाणी बाधल जाणार होत त्यात भगतपूर आणि त्याच्या आसपासची चार पाच खेडीं होती. ह्या खेड्यातल्या शेतकऱ्याना आणि जमिनीच्या मालकाना यथाकाल नोटिशी मिळाल्या भगतपूरच्या मराठमोळ्यापुढ मोठा पेच उभा राहिला. जमीन गेली म्हणजे आपली काय दशा होणार, आपल्या चिल्लापिल्लाच्या भावी आयुष्याच्या आराखड्यात अन्नाला महाग होण्याचे दुर्भाग्यच अधिक रंगविले जाणार काय, वगैरे शका विचारानी तो मराठमोळा गोंधळून गेला. इतर आसपासच्या खेडेगावाप्रमाणे भगतपूरमध्येही काही लोक काय होईल ते होवो, पण वडिलार्जित जमिनीवरून पाय काढायचा नाही अशी निश्चयी भाषा बोलत होते, व कांहीं लोक आपली असहाय्यता ओळखून निराशेचा वाटा उचलीत होते. शेतकऱ्याचा प्राण त्याच्या जमिनीच्या काळ्या पण मऊ मऊ आणि रसाळ कुशींत झोपत असतो, हसत असतो. त्याच्या कणखर प्रेमातली भावना ताटातुटीची भाषा बोलताच जोराने उसळून यायची. पण भावनेची प्रेरणा आणि बुद्धीची धारणा याचा मेळ आपल्या मर्यादित अनुभवक्षेत्रात जरी मराठमोळ्याला नैसर्गिक रीत्या बहुतेक वेळा अचुक घालता येई, तरी जगाच्या व्यापक पण अनोळखी शक्तींच्या काटकोनात त्याची मति बावरून जाई.

भगतपूरच्या मराठमोळ्यानें एकेकट्याने, गट बनवून आणि सार्वजनिक रीत्याही ओढवणाऱ्या संकटाचा उहापोह केला. त्याची बातमी भावडू गोंधळ्याला समजली मुबईला. भावडू गोंधळ्याने बाहेरच जग थोडंस पाहिलेल. त्यानें भगतपूरला निरोप पाठविला कीं, मी एक महिन्यानं आठ दिवसाची रजा घेऊन भगतपूरला येतों. तेव्हां गांवाने काय करायच ते ठरवू. त्याप्रमाणें जेव्हा भावडू गोंधळी भगतपूरला आला तेव्हा एक दिवस रात्री भगतपूरचा मराठमोळा एके ठिकाणी विठोबाच्या देवळा-

पुढील मडपात भावडूचा सल्ला घ्यायला जमला. त्या रात्री पुष्कळ वादही झाला.

" पन आमी म्हनतो ह्या लोक यऊन आमचं नुकसान काय म्हणून करणार अन् आमी कुठ जावा घरदार सोडून. आमी पैसाला काय करणार!" गुलाब वाणी जोराने प्रतिपादीत होता.

" पर् ह्यो बघा गुलाबशेट, गाव इथून हलल तर धरनाखाली दुसर गाव वसल त्यात तुम्हाला धदा कराया मिळलच कीं. " भावडू गोधळ्याने त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

" मी बी त्येच म्हनतुया समद्यास्नी, " दणकट विठूने भावडूच्या विचारसरणीला दुजोरा देत म्हटलं. " आपल घरदार इथनं ग्येलं तरी हा सारा प्रात जर सुबत्तेचा होवायचा असल तर त्यात काय मोठ हाय ? मराठा गडी मनगटात जोर हाय तंवर भुका मरायचा नाय. अन् पोराबाळास्नी बी मरूं द्येयाचा नाय. "

" त्ये ठीक झालं, इठू. मनगटात जोर आमच्या बी हाय, " सख्या चिडून म्हणाला. " पर आमचं जुनं घर अन् वडिलापास्नी आलेली जमीन आमी काय म्हून सोडू ? मजूरीचं काय आज हाय उद्या नाय. पर जमीन अंगाशीं ठेवली तर वडिलाच नाव रहात अन् त्येच्या नांवाच्या पुन्याईनं आमी रहातो. "

" भावडू म्हनतोय की ह्ये धरन बाधलं म्हजे आपल्या चिल्ला-पिल्लांना शिकायला चागली जागा व्हईल अन् त्ये शिकून शहानं झाल म्हंजे त्येंच्या पोटात दोन घास सुखाच पडल, " तुळजा म्हणाली. " पन नाग-रायचं अन् म्हशींची धार काढायची ह्येंत आमचा समदा जनम् गेला. इद्या आली बी मुलास्नी तरी नागरण्यात अन् गोठ्यांतच त्येंना खात्रीची भाकर मिळल. "

" म्यां लइ इच्यार केलाय, " म्हातारा सदोबा म्हणाला. " पर मला हये लक्षण काइ ठीक दिसत नाइ. आपन पडल गावढळ. वाइच भाडण करीत बसल तरी सरकारची अन् त्ये कंपनीची मर्जी असल त्ये होयाबिगर रहानार नाय. "

" का नाय रहानार ? " गणू पाडू रागावून उत्तरला. " आमी काय दुसऱ्या कोनाचा जमीन जुमला लुटतोय व्हय ! घरादाराचा सत्येनास झाला तरी आमी जमिनीत पाय रोंवून बसू. अन् त्येना म्हनावं फिरवा आमच्या धडावरन अन् हाडावरन नागर. आमी समद्या भगतपूरच्या मराठमोळ्यानं निश्चय केला तर यक तसूभरबी लागवड जमीन जानार नाय."

" अरे गणू , हमरी तुमरीवर येऊनशान् काइ साधायचं हाय का इथं." तुक्याने गणू पाडूला शात करीत म्हटलं. तुक्याच्या व्यवहारी ज्ञानावर भगतपूरचा विश्वास होता. आणि शेवटीं त्या सर्व वादाच फळ म्हणून तुक्याला आणि भावडू गोंधळ्याला आणि शामरावला सरकारकडे व कपनीकडे पाठवून काहीं उपयोग झाला तर पहावा एवढं ठरविण्यात झाला.

अर्थात् तुक्याच्या भावडूच्या आणि शामरावाच्या शिष्टाईला यश मिळणार नव्हतच. शामरावनें शेवटचा उपाय म्हणून सत्याग्रह करायचं ठरविलं. पण त्यापासून कांही फायदा होईल अशी त्याला आशा नव्हती. आणि भावी कालात त्याचा परिणाम फक्त धोंडू प्राणाला मुकण्यात झाला.

दिवसामागून दिवस गेले आणि भगतपूरच्या मराठमोळ्याने घरदार, जमीन जुमला सोडण्याच्या नोटिशीची तारीख दारात आलेली पाहिली. जमेल त्याप्रमाणे सारा मराठमोळा भगतपूर सोडायला लागला. चारशें पाचशे घरांचं तें सामुदायिक स्थलांतर होतं. पूर्वीच्या बुद्ध भिक्षुसंघाप्रमाणें भगतपूरचा निर्वासित, अज्ञानी मराठमोळा अदृष्टाच्या यात्रेला अनेक दिशांनीं निघत होता. त्याच्या दृश्याकडे पाहून क्षणभर तरी प्रेक्षकाचा चेहेरा गंभीर

भावनेनें पुलकित झाला असता ! कुणी लहान पोराबाळाना पाठीशी घालून तर कुणी त्याना गाड्यातल्या सामानावर बसवून चाललीं होती; कुणी घरा तली चीजवस्त बहुरंगी गाठोड्यात कशी तरी कोंबून गाई–म्हशीवर लादीत होतं, तर कुणी डोक्यावर ओझी घेऊन बाहेर पडत होतं; कुणी पायीच वाट चालायला लागत होतं, तर कुणी नागराचे बैल गाड्याला जुपून त्यातून कृष्णामाई ओलाडीत होतं ! स्त्री पुरुष, कचकड्याची बाहुली किंवा इटीदाडू हातात घट्ट धरणारी लहान अर्भक आणि डगमगणारी पावलं काठीच्या सहाय्याने स्थिरावणारे म्हातारे कोतारे; मळक्या कुडत्यातूनही भरदार छाती दाखविणारे जवान आणि नऊ महिने भरून आल्याने असहाय झालेल्या माता; हिरवी साडी नेसलेली आणि ताबडी चोळी घातलेली तुळजा, आणि काळी घोंगडी खाद्यावर टाकलेला आणि पायात जाड वहाणा घातलेला सख्या; घारीच्या डोळ्यानीं एक फर्लांग पुढे चाललेल्या आपल्या गाड्यावरच सामान राखणारी मैना, आणि धाकट्या भावाचा हात धरून पायाखालचा रस्ताही चाचपडत जाणारा आधळा गोविंदशाहीर, निरनिराळ्या डब्यात आणि पेट्यात मालमत्ता घालून रस्त्याला लागलेला गुलाब वाणी आणि गोणपाटात, फाटलेल्या पोत्यात किंवा जुन्या लुगड्या धोतरात भाडी कुंडी, व कपडालत्ता कसाबसा लपवीत गाडा हाकणारा म्हातारा निलभट, आणि शेवटीं मालकाचा माती मोलाचा दरिद्री संसार, न शरमता, डगडगत पाठीवर वहाणारा सोनु कुमाराचा गाढव ! शाळेतले नवीन भोसले मास्तर शंकरभटजीच्या मधूला तुम्ही कुठं रहाणार म्हणून विचारीत होते, तर यमुनाबाई गोदीला जिल्ह्याच्या गावी आपल्या घरीं भेटायला यायला चुकू नको म्हणून बजावीत होत्या; आईच्या आज्ञेनुसार तान्ही विठोबा रखुमाईच्या देवळात एक नारळ आणि दोन पैसे ठेऊन येत होती, तर ईशान्येकडून

चालता स्तन देत होतो, राम्याने लक्ष्मणाला राम राम केला; सीता काकूनी रुक्मिणीचा निरोप घेतला; कोंडीबाने तानाजीरावाला राम राम केला; भगतपूरच्या मराठमोळ्याची पागापाग घ्हायला लागली, कृष्णेच्या पाण्यात पाय आणि चाक खळखळायला लागलीं !

"ह्यो अवदाची पंढरपूर आळंदी" असं म्हणत म्हातारा सदोबा साळुकीनंतर गाड्यात चढला. विठू गाडा हाकायला लागला. गाड्याला दोरीने बांधलेली म्हैस चालू लागली. तिच्या मागून संथ पावलांनी तुक्या उजवा हात आणि डावी बाही हलवीत मार्ग आक्रमू लागला.

मराठमोळा, अदृष्टाच्या यात्रेला कुठही आणि केव्हाही असाच भोळ्या अंतःकरणाने आणि कणखर मनाने निघतो.



## — ५ —

" ओ भिक्या, भिक्या ओ ! अरं इकडं ये की ! इकडं माडीभर पानी हाय–" दहा वर्षाच्या नाम्यानें हाक मारली आपल्या सोबत्याला.

" आलुया रे. हये हिरवी गारगोटी अन् मोठा शंख सापडला इथ त्ये घेऊं दे कीं परथम्." भिकूनें लाबूनच आपल्या तीनचार मित्रांच्या घोळक्यातून पुढे गेलेल्या नामदेवाला उत्तर दिल. आणि हिरव्या गारगोट्या आणि मोठे शख घेऊन तो पाणी तुडवीत तुडवीत व त्याच्या बरोबरीचे मित्र एकमेकांच्या उघड्या अंगावर जाता जाता पाण्याचे फवारे उडवीत असे सगळे मिळून जलक्रीडा करण्यात दग होते.

त्यांची ती जलक्रीडा भगतपूरच्या धरणावर काम करणारा विठू मोठ्या मौजेने न्याहाळीत होता. धरणाची भिंत आतां छाती इतकी वर आली होती. तिच्या रुंद चौथऱ्यावर काम करणाऱ्या गवंड्याला सीमेंट कांक्रीटच्या पाट्या बायकाकडून घेऊन देण्याचं काम विठूचं होत. सकाळची दहा अकराची वेळ होती, आणि धरणानें अडवलेलं कृष्णेचं पाणी फारतर माड्यापर्यंत खोल असल्याने धरणाजवळ वस्तीला आलेल्या लोकाच्या बालगोपालांची जलक्रीडेची हौस यथेच्छ फिटत होती. काम करता करता विठू समोरचं कृष्णेच्या पात्रातलं नितळ आणि

किंचित् हिरव दिसणार पाणी आपल्याबरोबरच्या कामकऱ्याना दाखवीत असे. अजून धरणाची भिंत फार उच गेलेली नसल्यानें अडलेल्या पाण्यातून पात्राची करड्या रगाची वाळूच दिसत होती अस नव्हे, तर त्या वाळूंतील हिरव्या, पाढऱ्या, तपकिरी, विटकरी रगाचे, अनेक गुळगुळीत निरनिराळ्या वर्तुल, लंब वर्तुल किंवा अशाच इतर आकाराचे गोटे वा गोट्या; धूसर किंवा शुभ्र शिपले आणि शख; ह्या सर्वांच्या अद्भुत आणि आकर्षक रचनेने बनविलेला गालिचा सूर्याच्या किरणानीं प्रकाशित झालेला स्पष्ट दिसत होता. त्या नितळ, संथपणे झुळझुळणाऱ्या पाण्याची आणि त्याच्या जवळजवळ पारदर्शक उदरातून डोकावणाऱ्या रगीत आणि शिल्पित अशा पाषाणपुष्पाची शोभा विठूला आणि त्याच्याबरोबर काम करणाऱ्याना नेहमीच मनोरजक वाटायची.

उठलेल्या भगतपूरातून मजूरी काम करायला आलेल्या बऱ्याच कुटुबापैकीं सदोबाच कुटुब हे एक होत. त्याखेरीज गणू पाड्ठ आणि मैना, रामजी पाटलाचा मुलगा हरि, तान्ही आणि तान्हीचा नवरा अशी इतरही भगतपूरची मडळी होती. बहिरू लोहारही भगतपूरचाच होता. पण तो विठू काम करीत होता तेथून उत्तर दिशेला असलेल्या वर्कशॉपमध्ये आपल्या खेडेगावी कौशल्याचा प्रभाव दाखवीत होता. मोठमोठ्या लोखडी पाइपचे तुकडे, अनत स्क्रू, धगधगणाऱ्या भट्ट्या, लाकडाच्या छिलप्या आणि ताबडं लाल तप्त लोखंड, परजून तीक्ष्ण केलेलीं चमचमणारीं हत्याराचीं पाती, लहान मोठ्या यंत्राचे भाग, लाकडाच्या फळ्या इत्यादींच्या अनेकविध वैभवातल्या एका कोपऱ्यात आपल्या जागेवर बसून वर्कशॉपच्या मॅनेजरने आखून दिलेलं काम करण्यात बहिरू मग्न होता. समोरच्या ऐरणीवरील तप्त लोखंड त्याच्या हातोड्याच्या घावाखालीं ठिणग्याच्या फुलबाज्या फेकीत होतं. त्याच्या घण् घण् आवाजांत लाकूड रंधणाऱ्या कासीमचा खर् खस् खर् खस् असा फरफटता आवाज मिसळत होता. मधून मधून हरि मिस्त्री देखरेख करीत, चुक्या

दुरुस्त करीत किंवा कारागीराना सल्ला देत येरझारा घालीत आपल्या दणकट आवाजाचे ध्वनि त्या वर्कशॉपच्या विविध तालबद्ध कोलाहलात भिरकावीत होता.

" कासम, भाई ये प्लेन बराबर नही. ये देखो यहा दो इंच है और यहा सव्वा दो है."

" लेकिन् मिस्त्रीसाब, वो फलाटके उपर ऐसाही प्लाक चाहिये, मॅनेजरसाबने कहा—"

" —मिस्त्री, ह्यो पाइपला चार इंची स्क्रू लागल अन् आज दहा पौंड स्क्रू हायती फकस्त. परवाच्या दीस कस तयार व्हणार ह्ये पाइप ? अन् मोटं इंजिनिअरसाब म्हनत्याती तयार..."

" काइ नाय मल्हारी, आज सध्याकाळपरत लॉरी यणार हाय स्क्रू घेऊन—"

" —सभाळ दुर्गाप्रसाद, तो आइलचा डबा खालीं पडल !"

" हा मिस्त्री..."

पण मिस्त्री तेवढा इशारा दुर्गाप्रसादला देऊन वर्कशॉपच्या पाठीमागे गेला होता विडी ओढायला. तिथून त्याला त्या बैठ्या पत्र्याच्या वर्कशॉपवरून खालीं दोन अवाढव्य पाइप, अजस्त्र अजगराप्रमाणे, सूर्याच्या उन्हात फूत्कारताना दिसत होते. धरणाची भिंत जसजशी वर गेली होती तसतसं तिच्या पलीकडील बाधलेलं पाणी चढत होतं. ते पाणी धरणाच्या भिंतींत लपलेलीं लोखंडाची भलीं मोठी झडपाची दार कमी अधिक उघडून त्या अजस्त्र अजगरी पाइपाच्या पोटातून खालीं सोडून दिल जात असताना अस्पष्टपणें घोंघावत उतरत होतं. त्याच्या सहाय्यानें बंधारलेल्या पाण्याला योग्य त्या पातळीच्या वर जाऊं न देण्याची व्यवस्था धरणाच्या भिंतीवर काम करणाराकरितां केली जात होती. वर्कशॉपमध्यें पुन्हा शिरण्यापूर्वी हरी मिस्त्रीनें विडीचा एक झुरका घेतला, आणि सभोंवतालीं लोखंड, दगड, सीमेंट, लाकूड आणि

पोलाद याच्या करड्या यत्रयुगी चित्रात मधून मधून झळकणाऱ्या नारिंगी पेटने आणलेल्या रगीत जिवतपणावर नजर टाकली.

त्या नारिंगी पेटच्या रगीत जिवतपणाची नादी वर्कशॉपपासून आठ दहा फर्लांगावर असलेल्या, मुख्य कस्ट्रक्शन इजिनिअर मि. पेस्तनजी दादाभाई याच्या कच्च्या विटाच्या झोपडीपुढील हिरव्या वेलींनी आणि पिवळ्या निळ्या, गुलाबी फुलाच्या कुड्यानी उचलली आणि आळवली होती. त्या छोटेखानी बगीचाच श्रेय जस मि. पेस्तनजी दादाभाईची पत्नी पेरिनबाई हिला होत, तसच त्या मुख्य इजिनिअरच्या हाताखाली आणि आसपास असलेल्या लोकाच्या आरोग्याच श्रेयही पण तिलाच होत. मि. पेस्तनजी दादाभाई हे भल्या मोठ्या अगयष्टीचे, पाश्चात्य देशात शिकलेल, विनोदी आणि प्रेमळ गृहस्थ होते. त्याच्या प्रेमळपणाने आणि विनोदी स्वभावाने त्यानी सर्वांची अत:करण आपल्याकडे ओढून घेतली होती. म्हणूनच सर्व लहान मुल त्याना पेस्तनबाबा म्हणत. ते आणि पेरिनबाई आपल्या मुलाना मुंबईस ठेवून दोघेच त्या ठिकाणी रहात होती. भगतपूरच्या धरणानिमित्त तेथे एक छोटस गावच वसल होत. त्यात कुणी आजारी पडल की, डॉक्टरकीची परीक्षा पास झालेल्या पेरिनबाई त्याला आपल्या इवल्याशा दवाखान्यात औषधोपचार करायच्या.

पेस्तनबाबा सगळीकडे सकाळची फेरी मारून, पहाणी करून येऊन आपल्या झोपडीच्या व्हराड्यात बसले होते. धरणाच्या पाण्यावरून गार वारा येत होता, आणि त्याबरोबर धरणाच्या भिंतीवर काम करणाऱ्या बायकाच सघगीत ऐकू येत होत.

**शिमग्यांत झालं लगिन् ग । लगिन् ग ॥**
**सासू बसली रुसून् ग । रुसून ग ॥**
**सासरा झोंपला खाऊन् ग । खाऊन् ग ॥**
**दीर गेला फुगून् ग । फुगून् ग ॥**
**सून हंसली पाहुन् ग । पाहुन् ग ॥**
**कोन आलं मागुन् ग । मागुन् ग ॥**

तें सघगीत ऐकता ऐकता पेस्तनबाबाच्या चेहऱ्यावर शात, गार आनंदाच अस्फुट हास्य उगवत होत. त्या तंद्रींतच ते दाराशीं उभा असलेल्या तुक्याला म्हणाले.

" तुकाराम, हे तुमची मराठा बायको गाना चागला गाते. आमी पेरिनला सागते असा गाना गा. पण ते पिआनोवर टण् टण् तररर् टण् टण् टणन् करते !"

इतक्यात शेजारच्या सीमेंटच्या चक्कीवर काम करीत असलेला एक मनुष्य रक्तबंबाळ झालेला हात घेऊन धावत आला. त्यासरशीं पेस्तनबाबा उठले एकदम आणि ओरडले—

" अेर, काय झाला हे ! पेरिन्, ओ पेरिन् अरे तमे वहेल्रा आवो. ए सू किधो ! जगली माणस छे ! पेरिन्, ए मोतीना लोइ बहुच निकलेच. जलदीथी एवनने आयोडिन लगाडो. तुकाराम, अरे पेरिन् बाईने बोलावो..."

भगतपूर सोडून तुक्या प्रथम जो आला तो नोकरी शोधीत धरणावरल्या मुख्य इंजिनिअरकडेच. धरणावरची मजूरी म्हणजे मेहनतीची. पण एका हाताच्या अभावीं तुक्याला फारस मेहनतीचं काम करणं अशक्य होतं. ' तू काय काम करशील ' म्हणून पेस्तनबाबानीं जेव्हा त्याला विचारल तेव्हा त्याने हंसून आपल्या लुळ्या अंगाकडे पाहिलं आणि तो म्हणाला :

" ह्यो हात लढाईत कामास आला. पर ह्यो दुसरा हात हाय अजून कामाकरतां. तोंवर काइ शिपायाचं नाय तर पहाऱ्याच काम..."

पेस्तनबाबाना तुक्याची कींव आली म्हणा किंवा ते क्षणैक एका अंतस्फूर्तीला बळी पडले म्हणा, पण त्यानीं आणि पेरिनबाईनीं तुक्याला आपल्या झोंपडीत खाजगी कामावर म्हणजे नुसत्या सामान सुमानाच्या आणि कूज्याच्या देखरेखीवर ठेऊन घेतलं. पेस्तनबाबाच्या झोंपडीपासून तुक्याचं

तट्टया–पत्र्याचं खोपट दोन फर्लांगावर होतं. त्याची वाट अगोदर कच्च्या विटाच्या दोन चार झोंपड्याच्या मधून आणि नतर अस्ताव्यस्तपणें पसरलेल्या अनेक तट्टया–पत्र्याच्या खोपटातून नागमोडी मार्गाने गेली होती. ती वाट पेस्तनबाबाला अपरिचित नव्हती; आणि आपल्या अनेक फेऱ्यापैकीं एक फेरी मारीत ते जेव्हा तुक्याच्या खोपटापाशी येत तेव्हा कधींही न विसरता ते साळुंकीची आणि म्हाताऱ्या सदोबाची चौकशी करीत.

"काय साळुकी, पेरिनबाई आमाला बोलत होती: तेचा फूल तुमाला आता पसत नाइ म्हणून!"

"राम राम जी, नाइ पर दोन दिस झाल सद्बाला जरा बरं वाटत नव्हतं नव का, म्हूनशान् पेरिनआईकडे..." साळुंकी डोकीवर पदर ओढून अदबीने पेस्तनबाबाला उत्तर देत होती. पण तिचं वाक्य पुरं व्हायच्या अगोदरच पेस्तनबाबा उद्गारले,

"अरे काय झाला आहे तेला..."

पण सदोबाच पेस्तनबाबाचे शब्द ऐकून बाहेर आला होता. त्यानें पेस्तनबाबाना रामराम करून म्हटल,

"वाइच जरा परवांपास्नं ह्य अर्ध शीर ठणकतया."

"अरे, सीर काय ठणकतो. तुम्ही म्हातारा माणूस घरात फार बसते. जरा फिरायला जावा संध्याकाळीं. आमी पेरिनबाईला बी हेच सागते कीं संध्याकाळीं फिरायला जावा. अने खूप खावा. साळुंकी चागला रांधते कां नाही? एक राजाची गोष्ट माहीत आहे ना. ते राजाला चार बायको होती. तेने एक दिवस वजीरला जेवायला बोलावला अने त्येचा बायकोंना सांगतला..."

पेस्तनबाबांची ही फेरी आठवड्यातून एकदा दोनदा तरी तुक्याच्या घरीं यायचीच. घरात म्हातारा सदोबा आणि साळुंकी हीं त्याना भेटलीं

नाहीत अस क्वचित्च व्हायच. कारण, विठोबा रखमाईच्या कृपेनें तुक्याला, आणि तुक्यामुळे विठूला दोघानाही तेथे धरणावर काम मिळाल होतं. त्यामुळे म्हाताऱ्या सदोबाला किंवा साळुकीला कामावर जाण्याची नि मोल मजुरी करण्याची जरूरी भासली नव्हती. भगतपूरच्या घरांतल्या भाड्याकुंड्यानींच साळुकीनं आपल तट्टया-पत्र्याच खोपटं सजवल होतं. चकाकणारी पितळेची स्वच्छ भाडीं एका कोपऱ्यात नीट लावून ठेवलेलीं नि त्याच्या जवळच शिधा सामग्रीचे डबे नि पिशव्या; भिंतीवर कपडे टागलेले आणि छपरापासून खालीं लोंबणारे काद्याचे मोठे झुपके. जितक्या समाधानानें भगतपूरचा जोंधळा म्हाताऱ्या सदोबाच्या कटुबाने पूर्वी पिकवला नि खाल्ला तितक्याच समाधानाने आजही तुक्याच कुटुब मजुरीच्या पैशावर भाजलेली साळुकीची भाकरी खात होतं. प्रथम प्रथम भगतपूरच्या जुन्या ओळखीपलीकडे त्या कुटुंबाला कुणी सोबत नव्हत. पण हळूं हळू नवीन स्नेहाचे धागे धरणापुढे आपातत: एकत्र आलेल्या कुटुंबात जणू लागले. तरीही, विठूचा आणि पलीकडच्या खोपटातील शिंद्याच्या येसूचा विचार साळुंकीच्या मनात एकत्र होऊन यायचा तेवढा अपवाद सोडल्यास एकंदरीत तुक्याच कुटुब फारसं कुणाच्या पाशात अडकल नव्हतं.

सकाळ झाली की न्यहारी करून तुक्या आणि विठू आपआपल्या कामावर जायचे. दुपारीं बारा वाजतां जेवायला फक्त विठूच घरीं यायचा. तुक्याच जेवण पेरिन्बाईकडेच होत असे. रात्रीचं जेवण मात्र सर्व कुटुंबाच एकत्र व्हायचं. म्हणून म्हातारा सदोबा रोज सध्याकाळीं धरणापुढील भाजी-बाजारात भाजी विकत घ्यायला मुद्दाम स्वत: जायचा. तेवढंच त्याला समाधान कीं, तुक्या-विठूच्या जीवनात आपण अगदींच अडगळ म्हणून नाहीं. सध्याकाळीं तुक्या-विठू घरीं यायचे तेव्हा आपल्या तट्टया-पत्र्याच्या खोपटाच्या एका कोपऱ्यातला अंधार स्वैपाकाच्या चुळीतला जाळ नाहीसा करीत

आहे, दुसऱ्या कोपऱ्यात साळुकी वालाच्या शेगा निवडते आहे, किंवा वागीं चिरते आहे, दाराच्या एका बाजूला बसून म्हातारा सदोबा साळुकीशीं शिळोप्याच्या गप्पा मारीत रोज मुलाची आणि नातवाची वाट पहात आहे; आणि त्या सर्वांवर एक मिण् मिण् दिवा अधुक प्रकाश पाडीत आहे; अस ठरलेल दृश्य त्याना रोज दिसायचं.

म्हाताऱ्या सदोबाच्या वस्तुतः परिणामशून्य आणि असहाय अशा आशीर्वादाच्या छत्राखालीं सजवलेल, तुक्याच्या ताडपत्री खोपटातल कौटुंबिक चित्र ! त्यात जितक अजाण समाधानाच कारुण्य होतं तितकंच त्या धरणाखाली बसलेल्या उपऱ्या गावात यदृच्छया एके ठिकाणीं जमलेल्या नाना तऱ्हेच्या लोकाच्या सामुदायिक जीवनाच्या चित्रातही होत. त्या दोघाच्याही भावी भाग्याची रूपरेषा भगतपूरच्या धरणावर सीमेंट कॉंक्रीटनें बाधली जात होती. पण धरणाखालील सामुदायिक जीवनात त्याची तादृश जाणीव फारशी दिसत नव्हती. सूर्य अस्ताला जाऊन अधार पडला म्हणजे धरणाखालील शेंकडो ताडपत्री खोपटातून नि कच्या झोपड्यातून प्रथम धूराच्या लडी उलगडत उलगडत, स्वैर वेटोळ्यानीं अंतराळात चढायच्या; नतर एका मागून एक अंधुक दिवे लुकलुकायला लागायचे ! पण धरणाखालील सामुदायिक जीवनाचं खरं प्रतीक ह्या विस्कळित दिव्यानीं व अस्ताव्यस्तपणें पसरणाऱ्या धूरानें निर्माण केलेल्या झालरींत नसून तेथील वस्तीच्या बाजारपेठेच्या पटात होतं.

त्या बाजार—पटात अनेक दृश्यें होतीं. भोळारामचं ‘ हिंदु हॉटेल ’ किटसन् लाइटच्या प्रकाशात एका बाजूला लखलखत होत. त्यात काहीं लोक हौशीखातर जिव्हालौल्य पुरवायला आले होते.

“ एक पावणा कप अन् एक प्लेट भजीं,” असं गिऱ्हाइकान म्हटलं कीं, खाद्यावर मळकट फडकं टाकलेला छोकरा दोन मिनिटात त्या गिऱ्हा-

इकाच्या पुढील संगमरवरी दगडाच्या गुळगुळित पण चिकट टेबलावर " हूं एक पावणा कप अन् एक प्लेट भर्जी " असा ललकार देत ते पदार्थ आणून ठेवी. आणि लगेचः

" एक सोडा लिंबू "......" ह एक सोडा लिंबूऽ"

" एका बटाटावडा अन् चार उसळीं."......" हूं एक बटाटावडा अन् चार उसळीं ऽ"

" दोन नानकटाई अन् दोन गरम चहा."......" दोन नान कटाई, दोन गरम चहा ऽ"

त्या ' हिंदु हॉटेल'च्या बाजूनेच शिराळणीच पान विडीच दुकान मिण् मिण् दिव्याच्या प्रकाशात डोकावत होत. त्यापुढें एकामागून एक मागण्या उमटायच्या.

" दोन पाढरा हत्ती..."

" चार मसाल्याच अन् एक साधा इडा......"

" अरं शिराळणी, किती वकुत झाला उभा हाय मी. यक विड्याचं बडल दे कीं..."

" एक पान और एक तबाखू लाव......"

भोळारामच्या ' हिंदु हॉटेल'च्या समोरच भंगतपूरच्या गुलाब वाण्यानें आपलं किराणा मालाचं दुकान थाटल होत. त्यात डिटमार कंदीलाच्या प्रकाशात गुलाबवाणी आणि त्याचा भाऊ हिरामण गिऱ्हाईकाना माल देण्यात दंग होते. धान्याचीं, साखरेचीं, गुळांचीं पोतीं; गोड्या तेलाचे लिबलिबित, ओलसर आणि मळकट डबे; पिवळसर पांढऱ्या तुपाचा वास; ताबुस, काळ्या, पाढऱ्या पिवळ्या, रंगाच्या दाण्यांनीं नि डाळींनीं भरलेले कांचेचे डबे; आणि निर-निराळीं तांब्यापितळेचीं मापें व एक लहान नि एक मोठी तराजू; अशा

वैभवात गुलाबवाण्याला भगतपूरची आठवण झालीच तर ती म्हाताऱ्या सदोबाच्या एकाद्या खोचदार प्रश्नाने :

" काय गुलाबशेट, इक्री कशी काय हाय ! "

" चाललय कस तरी सद्बा. पोटाला भाकरी मिळते बस. "

" अरे मला इसरायाच होत की, गुलाबशेट. त्यो कासम म्हणत व्हता तुमचं देण हायना त्येवर व्याज जरा कमी व्हइल का म्हून इच्यारा तुमास्नी. "

" हे पहा सद्बा, ह्या दुकानाला बी पैसा कमी करून मी त्याची गरज भागवली अन्—"

" वो शेट, शेट वो ! वो ऽ शेट, भिकारणीला काइ द्या वो ऽ शेट..."

धरणाखालच्या वस्तींत अनेकरगी फाटकीं, बिटकी लक्तरं अंगाभोवतीं गुडाळलेल्या किंवा न गुडाळलेल्या विटबित देहाच्या भिकाऱ्याचा ताफा आपल्या ओंगळ पण केविलवाण्या दारिद्र्याचं प्रदर्शन माडीत, किंवा पोटाची खळगी आणि हाडाची झोळी कशीबशी लपवीत इतस्ततः विसरून भ्रमण करीत होता. गुलाबशेटच्या सुवर्णभूमीच तें एक अपरिहार्य आणि अगातुक, निर्लज्ज आणि ओशाळलेलं, विद्रूप आणि विदारक अस लेण धरणाखालच्या वस्तीलाही लाभल नसत तरच नवल !...

रात्रीचे नऊ वाजायला आले कीं हा सगळा गजबजलेला बाजार शात होऊं लागायचा. धरणावरील मजुरीचं काम आणि बाजारांतील जरूरीच्या वा हौशीच्या खेपा किंवा सफरी याच्या परिघातून करमणुकीकरितां बाहेर पडायलाही त्या उपऱ्या लोकवस्तीला वाव असे. त्याच्या करमणुकीच स्वरूप बव्हंशीं सामुदायिकच होतं. त्यात मधल्या पटागणात बसून पोपटाच्या अजाणपणानें टाळ मृदुंगाच्या साथीबरोबर अभंगाचे पडसाद उठविणारे गट होते—

—"कांहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ॥
देव तयासीं म्हणावें । त्याचे चरणीं लीन व्हावे ॥
भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥
नाहीं नाहीं त्या समान । तुका म्हणे मी जमान ॥"—

त्या गटाप्रमाणेच सुट्टीच्या दिवशी कुस्त्याचे सामने खेळणारे छोटे पहिलवान आणि ते पहाण्यास अहमहमिकेने गर्दी करणाऱ्या प्रेक्षकाच्या झुंड्याही होत्या. ह्या दोहोंचाही कंटाळा आला तर भगतपूराहून आपल्या भावाला बरोबर घेऊन धरणाच्या पायथ्याशी मराठ्याच्या भूतकाळाला आळवणारा, खड्या आवाजाचा आधळा गोविंदशाहीर त्याच्या मनोवृत्तीना उत्तेजित करायला होताच. ही पहा डफावर थाप बसली आणि शब्द थरारले :

—"थोर मांडली रणधुमाळी । अगदींच बसली मग कांठाली ।
फौज पसरली रानोमाळीं । लाखोलाख तलवार झळाळी"—

अशा रितीनें वीररसाचा उत्कर्ष साधीत आधळा गोविंदशाहीर त्या अडाणी लोकाना कांहीं वेळा क्षणभर पुलकित करायचा, तर इतर वेळा गिरिजा नायकीण आपल्या नाजुक गळ्यातून फेंकलेल्या लावणीच्या अवखळ पण कोमल लहरींनी तेथल्या श्रमजीवि श्रोत्याच्या मनावरला शिणाचा पापुद्रा हळूंच काढून टाकून त्याचं शृंगाररसानें रंजन करायची. तिच्या डोळ्याची, गळफास ओढणारी नजर श्रोत्यावर फिरकली कीं टाळी पडायची आणि धुंद हवेला सुराची नखरेल किनार लागायची—

—"अबलख पंचकल्याणी घोडा पळतो जी"

रात्रीं बारा वाजायला आले कीं मग मात्र अफाट आकाशाखालीं त्या उपऱ्या गांवाचा तो इवला रातकिडा निःशब्द व्हायचा.

आणि मग फक्त धरणाने बाधलेल, धरणाच्या भिंतीवर हापटणारं पाणी आणि भल्या मोठ्या लोखडी नळातून खालीं उतरत धबधबणार पाणी याचा अस्फुट साद दगडविटा; लोखड, पोलाद, लाकूड व सीमेंट कॉंक्रीट; गवंती ताव्या आणि लोखंडी पत्रे; पठार आणि पर्वत, वरच्या पाढऱ्या चादण्या आणि खालची हिरवीं पिवळीं पान; याना मधून मधून यायचा !

धरणाच्या बाधलेल्या भिंतीवर आपटणाऱ्या पाण्याची धप् धाप् धाप् धप्...!

आणि नळातून वहाणाऱ्या पाण्याची भरदार, खोल, गूढ धब् घोऽ, घोऽ घोऽ धब्...!

त्याबरोबरच नीट कानोसा घेतला तर तुक्याच्या ताडपत्री खोपटातील चार साडेतीन हाताच्या शिथिल देहातील, चार आमटीच्या वाव्याएवढ्या हृदयातील बारीक पण स्पष्ट टक्, टक्, टक् टक्...!

धप् धाप्, धप् धाप्, टक् टक्, टक् टक्...
धब् घोऽ, धब् घोंऽ, टक् टक्, टक् टक्...
धप् धाप्, टक् टक्, धब् घोंऽ, टक् टक्...

* * *

धरणाखालच्या जीवनात सुरवातीला थोडंसं अस्वस्थ वातावरण होत होतं. एकदा भगतपूरच्या शामरावानें तिथें सत्याग्रहाचा प्रयोग केला. विठूबरोबर सीमेंट कांक्रीट वहाणारा दगडू गोळी लागून मला. पण एकंदरींत थोडक्यावरच भागलं. दुसऱ्या एकदा वर्कशॉपखेरीज इतर सर्व मजूरांनीं संप केला. विठूही घरीं राहिला. पण तुक्या पेस्तमबाबाकडे नेहमींप्रमाणें कामाला गेला. दुसऱ्या दिवशीं तुक्याला एक दिवसाची रजा किंवा सुट्टी म्हणा

मिळाली आणि इतर मजूराबरोबर विठू धरणावर. सीमेंट कांक्रीट वाहाण्याच्या आपल्या कामाला लागला.

त्यानंतर मात्र पेस्तनबाबाच्या वजनानें आणि शिफारसीनें धरणावर काम करणाऱ्या प्रत्येक लहान मोठ्या मजूराला नि कारागिराला दर शनिवारीं न चुकता मजुरी नि पगार मिळायला लागला.

* * *

एक दिवस दुपारीं फिरतां फिरता म्हातारा सदोबा एका गारुड्याचा खेळ पहायला बाजारात थाबला. गारुड्याने गुड्गुड् करून आपल डमरूसारख वाद्य वाजवले, आणि तो निरनिराळे जादूचे किंवा नजरबंदीचे प्रयोग करूं लागला. धरणाखालचीं कितीतरी मुलं त्याच्या भोवतीं जमा झालीं होती. काहीं निरुपयोगी लोकही जमले होते. काहीं उद्योगाच्या चक्रातून दोन क्षण विसावा घेणार लोकही थाबले होते. म्हातारा सदोबा कुतुहलानें पहात होता. गारुड्यानें आपल्या पोतडींतून एक आंब्याची कोय काढली, आणि पुन्हा एकदा गुड् गुड् करीत डमरू वाजवून ती कोय एका टोपलीखालीं झाकली. म्हातारा सदोबा लहान मुलाच्या इतक्याच उत्कंठेने हें सर्व न्याहळीत होता. गारुड्यानें मधून मधून त्या कोयीला पाणी घालण्याचा बहाणा केला, आणि सभोवतालच्या मडळीना उद्देशून भाषण केलं कीं त्या कोयींतून आंब्याचं झाड पाच मिनिटात फळासह वर येईल म्हणून. म्हाताऱ्या सदोबाला माहीत होतं कीं, पांच मिनिटात कुठलंच रोप त्याच्या शेतात उगवलं नव्हतं. आणि गारुड्यानें काहींहीं केलं तरी पाच मिनिटात आंबा उगवून फळ धरीत नाहीं. गारुड्याने टोपलीखालीं पाणी घालण्याचा आणि वाकून पहाण्याचा, भाषणाचा आणि डमरूच्या गुडगुडण्याचा सपाटा चालविला होता. थोड्या वेळानें त्यानें टोपली उचलली आणि म्हातारा सदोबा पहातो तों खरोखरच एक आंब्याचें लहान कोंवळया पानाचें रोपटें तिथें आलें होतें. म्हातारा सदोबा आनंदानें

हसला. तो इतक्या तन्मयतेनें गारुड्याची करामत पहात होता कीं, शेजारीं उभी असलेली शिंद्याची येसूही त्याला दिसली नाहीं. पण गारुड्याने केलेली नजरबंदी सपताच त्याला ती दिसली.

"लइ खूष झाल्याती वाटत आबा उगवला पाहून, म्हातारबा!" येसू कौतुकाने हसत हसत म्हणाली.

"हा, गंमत हाय नाई! अन् कैरीबी लागलीया!" म्हातारा सदोबा आपल्या तद्रीतून जागा होऊन, या खाद्यावरच धोतर त्या खाद्यावर टाकीत उद्गारला.

* * * *

अन् रात्र आली.

—धप् टक् धाप् टक्, धप् टक् धाप् टक्...
टक् घोंऽ टक् धब्, टक् घोऽ टक् धब्...
घोऽ धप् टक् धाप्, टक् धब् धप् घोऽ...
धब्,—
टक्,—
घोऽऽ—



## — ६ —

महिन्यामागून महिने गेले. धरणाची भित जसजशी उच होत होती तसतशी बाधलेल्या पाण्याची खोली वाढत होती. धरणावर काम करणाऱ्या विठूला आता भिकू, नामदेव, आणि त्याचे मित्र त्या पाण्यात जलक्रीडा करताना दिसत नव्हते. हळू हळू भगतपूरचा वड पाण्यात अदृश्य झाला. त्या नंतर विठोबाच्या देवळाच्या शिखरावरून धरणानें बाधलेलं पाणी गेलं. अगदी शेवटीं, बाधलेल्या पाण्याने भगतपूरच्या अस्तित्वाची उरलेली एकच एक भौगोलिक खूण असे जे गंजलेल्या मोडक्या पत्र्याचे सार्वजनिक संडास, तेही गडप केलं. विठू आणि त्याचे सहकारी वाढत्या पाण्याचा हा उर्ध्वगामी विकास रोज नियमाने स्वतः नोंदीत आणि त्यातील निरनिराळे टप्पे बारकाईनें आणि काळजीपूर्वक इतराना दाखवीत.

रात्र अंधारी होती, पण आकाशात ढग नव्हते. विठू धरणाच्या भिंतीवर एकटाच उभा होता. त्याचा आणि त्याच्याप्रमाणेंच मजूरी करून पोट भरायला आलेल्या, धरणाखालील उपऱ्या लोकवस्तीचा त्या धरणाशीं आणि तेथल्या धरणीशी जमलेला ऋणानुबंध आठदहा दिवसातच तुटणार होता. विठूच्या समोर धरणानें बाधलेलं पाणी अस्ताव्यस्तपणें लोळणाऱ्या

वाघाप्रमाणे धरणी मातेच्या अंगावर पसरलं होतं. त्या पाण्यात कृष्णामाई गुप्त झाली होती. तिचा मागमूसही नव्हता. भिकू, नामदेव वगैरे अर्भकांनीं तुडविलेलं कृष्णेचं नितळ हिरवं पाणी हरपलं होतं. विठूच्या समोरचं अवाढव्य पाणी काळभोर होतं. त्या पाण्याच्या दृष्टीत राक्षसाची रग होती; मुठीत अजस्त्र शक्ति होती. कृष्णामाईच्या पात्रातली शिंपलेगोट्यांची रांगेत आणि शिल्पित फुलमाया अदृश्य झाली होती. रोज ते बांधलेलं पाणी पहाता पहाता मेलेली विठूची नजर आज त्या पाण्याच्या विस्तृत पृष्ठभागावरून अचानक बिचकून मागे फिरत होती. आकाशात चांदण्या होत्या, त्याच्या स्पष्ट प्रकाशात ते बांधलेलं अजस्त्र पाणी क्वचित् अगदीं संथ असायचं; पण लगेच क्षणार्धात वाऱ्याच्या लहरींबरोबर लाटांच्या असंख्य भरदार माना फुगून गर्दनगिरी खेळू लागायच्या; नि त्या पाण्यातून भीषण स्नायूंची पीळदार मस्ती सुरू झालेली दिसायची. दणकट घोंघावात ते बांधलेलं पाणी आपल्या अमानुष कैफी धुंदीत धरणाच्या भिंतीशीं टक्कर देत तुंबळून हापटत होतं आणि परत जाऊन पुन्हा टक्कर घेत होतं. त्या अफाट पाण्याच्या भोकरापेक्षा सहस्त्रपट मोठ्या डोळ्याच्या विरुपाक्षी कटाक्षाने विठूची मेलेली नजर जिवंत व्हायची; पण तिची पापणी त्या पाण्याच्या बेडर, अंदाधुंद आणि भेसूरपणें आव्हान देणाऱ्या नजरेला दृष्टी भिडवताना मात्र लवत होती, बिचकत होती.

धरणाच्या भिंतीवर विठू स्तब्ध उभा राहून समोर पसरलेल्या बांधलेल्या पाण्याच्या अमर्याद ऊर्धस्वर आणि जिवंत खळखळाटाकडे भारून गेल्याप्रमाणे पहात होता. वरुणाचं तें अथांग विराट स्वरुप आपल्याच मगरुर पण विरोधित अशा अचाट सामर्थ्याकडे गर्वाने पहात काळ्याभोर हिरव्या ओठांनीं उन्मादित हास्याचे बिकट फवारे फेसाळीत, उडवीत होतं. त्या दृश्याने विठूच्या मनाची इतकी पकड घेतली कीं त्या बांधलेल्या पाण्यानें गिळंकृत केलेल्या दोन ओळखीच्या जीवांची आठवणही तो विसरला. समोरील

लाटाच्या सुस्त पण उग्र मगरी जशा चांदण्यांच्या प्रतिबिंबानी विणलेल्या जाळ्यातून माना मुरगाळीत बाहेर पडायच्या, तशी विठूची नजर दबकायची नि त्या लाटा-मगरींचा मदोद्धत वास हुंगीत परत फिरायची. असं एकदा झालं, दोनदा झालं की विठू आजूबाजूला बघायचा, आणि त्याच्या गभीर चेहेऱ्यावर अनेक प्रश्नचिन्हांचे पडदे पडायचे. त्या बाधलेल्या पाण्यानें विठूची नजर बाधली, पण स्वतःच्या दृष्टीचा रोख त्याला लागू दिला नाही. खंडू मास्तराच्या हाताखालीं उनाडक्या करणारा विठू, भगतपूरात भूतचेटुकाच्या गोष्टींची टर उडवणारा विठू त्या बांधलेल्या पाण्यासमोर ठिसूळ, गोगलगाय बनला नाहीं हें खरं. पण, धरणापलीकडील पंचक्रोशीच्या भूमीवर स्वार होऊन उद्दामपणाने गुरगुरणाऱ्या त्या बाधलेल्या पाण्याच्या पजावरील रेषा विठूला वाचता येईनात. पंचमहाभूतापैकीं एकाच्या विशाल मंत्रानें आपल्या फक्त एका मुठींत दाबून धरलेली इतकी अजस्त्र शक्ति विठूनें पूर्वी कधींच अनुभवली नव्हती. तिच आकर्षण मनोहर आणि भयानक होत.

इतक्यात एका उसळत्या लाटेन वर उडवलेल पाणी विठूच्या पावलांवर पडलं. त्याच्या गार स्पर्शानें विठूच्या मनावरची मोहिनी उतरली. त्यानें एक खुला श्वास घेतला. आणि पाठीमागें वळून धरणाखालील मिणू मिणू दिव्यांचे असंख्य रोमांच उभे असलेल्या वस्तीकडे दृष्टी फेकली. नंतर तो धरणाच्या भिंतीवरून खालीं उतरला आणि आपल्या घराची वाट चालूं लागला.

चालतां चालतां तो शिंग्यांच्या खोपटावरून गेला. पाय पुढे सरकले तसें त्याचें मन मागें वळलें आणि येसूच्या विचाराशीं न कळत खेळूं लागलें. येसूची ओढ त्याला धरणावर आल्यापासूनच लागली होती. कधीं कधीं त्याच्या टणक् स्नायूंत विचार येऊन जाई...!

रेल्वे स्टेशनवरच्या वेटिंग रूममध्ये चार घटका प्रवासी एकत्र येतात नि आपआपल्या गाड्या प्लॅटफॉर्मला लागल्या की परत त्याची फाटाफूट होते. अदृश्याच्या वाटेवरील धरणाखालच्या धर्मशाळेत वस्तीला आलेले लोक असेच चार घटकानी नाहीं तर चार दिवसानीं पांगणार होते. धरणाखालच्या खोपटाच्या शिबिरात थोडावेळ विश्रांतीला आलेले जीवनाचे बारगीर आपल्या संसाराचा छोटा पसारा आवरून पुढच्या लढाईवर निघणार होते. पंढरपूरच्या वारकऱ्याच्या यात्रेतला एक टप्पा सपला आणि त्या टप्यातले ऋणानुबंध सपले ! आता दुसरा टप्पा ! पोटापाण्याच्या निमित्ताने ऋणानुबंध जमले ते पोटापाण्याच्या निमित्तानेंच तुटणार. धरणाखालच्या चार फर्लांग चौरस धरणीने जिला औटघटका पोटाशी कवटाळल तीच प्रजा तिच्या कुशीतून एकेक बाहेर पडू लागली.

जहाजावरचा कप्तान जस जहाज सगळयाच्या शेवटीं सोडतो तसच भगतपूरच्या धरणाचे मुख्य कंस्ट्रक्शन इंजिनिअर मि. पेस्तनजी दादाभाई धरणाखालची सगळी वस्ती उठून जाईपर्यंत तिथेच रहाणार होते. त्यामुळे तोपर्यंत तुक्याही तिथंच रहाणार होता. पण इतरानी निरोप घ्यायला सुरवात केली होती:

" आदाब अर्ज जी. मैं अभी कल यहासे चले जाना चहाता हू. "

" अरे ह्यो कासमभाई आलाय तुक्या, रामराम कराया, " सदोबा म्हणाला, " अन् कवा जाणार कासम ? "

" कल शामको. आजही जानेवाला था. लेकिन् मेरे बीबीका चचा यहा आके उसको और लडकेको अपने घर ले जाना चहाता हैं. और वो आज किसी वजायसे आ नहीं सका. कल सुबह आयेंगा. फिर मैं बंबई...... "

"राम राम, कासम. काय अब्दुल ठीक हाय ?" तुक्याने विचारलं. "अन् म्या ऐकल मुबईला जानार तू म्हून. पर तकड खालीं वर्कशाप व्हणार हाय तकड तो हरि मिस्त्री म्हणाला तुला जाया पेस्तनबाबानी सांगितलय."

"हां भाई, पेस्तनबाबाकी मर्जी है. लेकिन् खुदा जाने...."

एक दिवस गणू पाड्ळ आणि मैना आली. घरात तुक्या आणि विठू नव्हते. फक्त साळुकी आणि म्हातारा सदोबा बसले होते.

"राम राम सद्बा, कस काय ठीक हाय ना ?" मैना म्हणाली.

" ठीक हाय, मैना. कुठ जानार तूं अन् गणू ?"

"ह्येंचा इच्यार काइ अजून ठरत नाइ. गोठवडीस्न निरोप आला व्हता कीं कोंडूशेटची जमीन इकाया काढलीय. तवा म्या म्हटल आपल शेताच पैसें ठेवलंय ते अन् त्यात मी माझ्या गोट पाटल्याची भर घालीन अन् अपुन त्ये जमीन घेऊ. ह्यो मजुरीपाई वणवण करण्यापक्षा यक ठिकाणी बसून पोटाला दोन मिळतील सुखाचे घास अन् पोराबाळास्नी बी सोय व्हइल." मैना म्हणाली.

"त्ये खरं सद्बा, पर ती जमीन जरा कसाला कमी हाय." गणू म्हणाला.

' मैना, गोदीला नाय आणलं ? ह्ये लिमलेटची वडी तिला घेऊन जा." साळुंकी म्हणाली. "अन् गोदीच्या लग्नाला पन् अमास्नी....."—

अशीच भगतपूरची जुनी ऋणानुबंधी त्याचप्रमाणें धरणाखालची नवी ऋणानुबंधी मंडळी येऊन तुक्याच्या कुटुबाचा निरोप घेऊन गेली. काशी आणि तिचा नवरा, बहिरू लोहार, रामजी पाटलाचा मुलगा हरी

वगैरेपैकीं कुणीही म्हाताऱ्या सदोबाला विसरले नाहीत. एक दिवस शिद्याची येसू आणि तिची आई आली.

"ये की येसू, बैस अशी हिथ," साळूकीने येसूला जवळ घेऊन म्हटलं.

"राम राम सद्बा," येसूची आई म्हणाली, "आमचं ठाण सपल. कुठं नेतोय इठोबा आता कुणास ठाऊक! अन ही इकडन तकड अन् तकडनं इकड कर्म कटकट! कुठ बी बुड रहायच नाई एक ठिकानला!"

"इठोबा काय येसू मागल तकड नेईल! खरं की नाय येसू?" म्हातारा सदोबा उद्गारला. त्यातला ध्वनि येसूच्या आणि तिच्या आईच्याही लक्ष्यात आला. येसू लाजून हसली. इतक्यात विठू बाहेरून आला. येसूला पाहून त्याच्या स्नायूंना आनद झाला. तो त्याने फक्त अदबीने येसूच्या आईला राम राम करून दाखविला.

"पन् तुमी अन् साळुकी पदरात घ्याल तवा ना!" येसूची आई म्हाताऱ्या सदोबाला म्हणाली.

"मी कोन हाय बा! काय इठू तयार हायस?" सदोबा म्हणाला. "इठू तयार असला कीं झाल. काय साळुके, खरं ना? पर् तुमी अन् लक्ष्मण कुठ जानार? मुबईला?"

"नाइ बा, येसूची थोरली बहिण हाय ना शितळगावाला तथं चार दीस रहायचा बेत हाय. अन् मग जमल तकड. इष्णूची शाळा बी पहाया....."—

शेवटीं गुलाबवाणीही म्हाताऱ्या सदोबाकडे येऊन गेला. त्याला निरोप देतांना म्हातारा सदोबा म्हणाला—

"राम राम, गुलाबशेट. पर् तुमची आमची भेट व्हइलच ना पुन्हां? इजेच्या गावला बी किराणा मालाच दुकान लागलच की. येणार ना तुमी तथं?"......

'इजेचं गांव!'—

ह्या 'विजेच्या गावा'चं चित्र धरणाखालून पागापाग होणाऱ्या लोकाच एक अस्पष्ट स्वप्न होतं आणि त्याच्या वैभवाकडे आशाळभूत नजरेने प्रत्येक धरणाखालून काम सुटलेला मजूर-कामगार पहात होता. हें 'विजेच गाव' भगतपूरच्या धरणापासून सात आठ मैलावर वसणार होत. धरणाच्या भितीने बाधलेले पाणी पाच सहा अवाढव्य लोखडी नळातून दर क्षणाला वाढणाऱ्या वेगानें उतरवून सात आठ मैलावर आणल जात होत. धरणाची भिंत इकडे जसजशी वर चढत होती तसतस तिथून सात आठ मैलावर निर-निराळीं यत्रे जमवून त्याची इमारतीत प्रतिष्ठापना होत होती.

धरणाखालच्या आपल्या खोपटातला प्रपंच तुक्याही इतराच्या बरोबर गुडाळणार होता तो ह्या 'विजेच्या गांवा'च्या दिशेने जाण्याकरिता. त्या 'विजेच्या गावा' वर 'एम्. एच्. ई.' ने नेमलेला नवा मुख्य इंजिनिअर हा पेस्तनबाबाचा एकेकाळचा सहाध्यायी नि मित्र होता. तुक्याने जेव्हा पेस्तनबाबा आणि पेरीनबाईबरोबर मुंबईला जाण्याबद्दल फारशी आतुरता दाखविली नाहीं तेव्हा पेस्तनबाबानें त्याची सोय 'विजेच्या गावा' वर नेमलेल्या मुख्य इंजिनिअरकडे लावली. पण 'विजेच्या गांवात' तुक्याला नोकरी मिळाली तरी फक्त साळुंकी आणि म्हातारा सदोबा याचा प्रश्न सुटणार होता. विठूचा प्रश्न त्याशिवाय होताच. अंग मोडून काम करण्याची विठूला संवय होती. पण 'विजेच्या गावा'त अंग मोडणाऱ्या कामापेक्षां डोकं शिणवणाऱ्या कामाचीच महती अधिक होती. भगतपूरच्या आपल्या शेतांवर भर दुपारचं ऊन डोक्यावर घेत विठू आनंदानें राबला

असता. जमिनीच्या नागरलेल्या चरातून इवलाली हिरवीं रोपटीं डोकीं वर काढू लागलीं म्हणजे ज्या हातानीं त्याच बी पेरल त्या हातानींच त्याच्या टवटवणाऱ्या मऊ पानाना स्पर्श करतांना जो आनंद त्याला मिळाला असता त्यात अर्धी मुर्धी मीठभाकरही त्याने गोड करून घेतली असती. पण ते सृजन–समाधान नाही, तर जिथे मजूरी अधिक मिळेल तिथें जाऊन आपलं प्रापंचिक नशिब पारखाव असं त्याला वाटे. ' विजेच्या गावा'त कुठल तरी काम करीत जन्मभर रहायच हा विचार त्याला पसत पडेना. उलट, अधिक पगार तिथ मिळवायचा तर स्क्रू कशाला म्हणतात आणि स्विच् कशाला म्हणतात ह्याचीही विठूला फारशी कल्पना नव्हती. धरणाखालच्या वर्कशॉपमध्यें एका चामड्याच्या पट्ट्याखाली वेगाने फिरणारं चाक किंवा रस्त्यावरचं खडी बसवणारं एंजिन आणि सीमेंटची चक्की एवढ्याच यान्त्रिक उपाधी-उपकरणाशीं त्याचा परिचय होता; आणि तोही दुरून अचबा आणि भीति याच्या संमिश्र कुतूहलाचा ! यंत्रयुगात शिक्षणाच्या अभावी विठू पोटापाण्याच्या प्रपंचात नादान ठरत होता. पण, त्याचबरोबर त्याच्या अंतःकरणांत जीवनाचा वीट येण्याऐवजीं एक विलक्षण असमाधान मात्र एकसारख वाढत होतं. धरणावरची शेवटची मजूरी घेऊन विठू जेव्हा बेकार झाला तेव्हां त्याची वृत्ति अत्यंत अस्वस्थ झाली. तो हताशपणे दुबळा बनला नाहीं याचं कारण त्याच्यावर अजून म्हाताऱ्या सदोबाचं आणि साळुंकी--तुक्याचं छत्र होतं. पण तारुण्यानें बहरलेलं मन आणि मजूरीच्या भावाने उल्हासिलेले स्नायू त्या छत्राच्या सावलीबाहेर दृष्टी फेकूं लागले होते. भगतपूरच्या जमिनीनें पोसलेला पिंड बेंबीची नाळ तुटून नव्या जगांत येऊन पडला होता ! आणि त्याच्या भावी वाढीची त्यालाही कल्पना नव्हती !

"कबूल हाय. इठू." तुक्या भाकरीचा घांस घेत म्हणाला. "तूं म्हणतोस त्ये समदं खरं हाय. पन् त्येची गोष्ट आतां करून काय फायदा

हाय ? बरं घरची जमीन कराया मिळली तर कुणाला नको हाय ? अन् तुझा जीव इकता असल जमिनीवर तर पाहू मिळते का कुठे. खर की नाय, बाबा ?"

"हं. इठूची इच्छा असल तर घेऊ कीं जमीन. भगतपूरच्या जमिनीचा पैसा हाय. पर मग एकदा नीट इच्यार करुन घ्यावा. पस्ताया नको मग." म्हातारा सदोबा म्हणाला.

"माज काइ नाय. पर मी पेस्तनबाबाला सागून चुकलो हाय. अन् शिवाय, जमिनीवर माजा काइ बी उपयोग नाइ, इठू. तू अन् बाबा मिळून करणार असाल पुन्हा जमीन..."

"अन् तुमी इजेच्या गावला रहानार तवा मी बी तिथंच रहानार." साळुकी म्हणाली. "अन मग बाबा अन् इटू समद कसं देखनार ? म्हून म्हनत्ये इठू तूं यकदा लगिन करून घे. नव्ह कां बाबा ? येसूचा अन् इठूचा जोडा कसा इठोबारकमाई सारखा हाय."

"मायची जवा तवा तीच गोष्ट. पर अदुगर पोटापान्याची येवस्था नाई अन् बाईल घेऊनश्यान काय करु ?" विठू म्हणाला.

"पर् मग तुजा इच्यार तरी काय हाय ?" तुक्याने विचारल. "आमच्या पायीं तुला काइ तरास नको. नसल तुजी इच्छा इजेच्या गावाला येण्याची तर आमी काइ जबरदस्ती करतोय व्हय. पर तुज्या मनामंदी काय असल तें सांग अन् कर कीं तसं."

"मी त्येच इच्यार करतुया, दादा. पर काइ नीट उमगत नाइ. इजेच्या गांवला येऊनशान् काइ फायदा दिसत नाय. जमीन बी इकत घ्येयाची पर आता जरा भीतीच वाटते. अन् जमीनींत बाबास्नी बी माज्यासंगं खटपट." तुक्या म्हणाला.

"माजी नको काळजी, इठू—" म्हातारा सदोबा म्हणाला. अरं म्हातारं मानस पिकल पान—उद्या गळायच तर आज गळल. अन् यकदा इच्यार करुन बेत ठरवला म्हजे इठोबारकुमाईवर भार ठेवायचा अन् काम करायच. जनमभर जमीन करीत ह्ये केस काळ्याच पाढर झाल अन ह्ये हात राकट झाल. पर् अजूनबी तुज्यासंगत नागर धरीन कीं येळ आली तर."

"मी सागत्ये," साळुकी म्हणाली, "इठूला जायचंय मंबईला."

"व्हय रे इठू," म्हातारा सदोबा म्हणाला. त्याच्या आवाजात न कळत थोडी हिरमुसल्याची झाक आली. कारण, त्याला वाटत होत कीं कदाचित् शेवटी विठू जमीन घेऊन द्या म्हणून म्हणेल आणि मग पुन्हा आपण शेतकरी बनून पेरणीकापणीच सुख अनुभवूं शकूं. पण विठूला मुबईला जायचं म्हणजे आपल्या साऱ्या मनोराज्यावर विरजण. तथापि म्हाताऱ्या सदोबाने विठूला विरोध केला नाही. तो लगेच पुढे म्हणाला—

"आपन समद शेतकरी लोक यकच ठिकाणी बसून राहतों. इठू मबईला जानार असल तर जरा बाहर पडल घरच्या. त्ये बी अक्षी चागलं. तू अन् मी तुक्या, आता जुन व्हनार. पन् आपुन इठू परमानं इच्यार कराया होव. त्येची उमेद हाय. अन् त्येची उमेद म्हंजे नया पिढीची उमेद हाय. खरं की नाय, साळुंकी ?"

"पर मी कवा त्येच्या उमेदीला पायबंद घातलाय ?" तुक्या म्हणाला. अन् त्येची खरंच इच्चा असल तर मी पेस्तनबाबाला सागतों. खुशीनं नेतील ते इठूला."

"पेस्तनबाबा लई चागल हायती. पर मला सव्तंत्र नोकरी करायची हाय. जुळलच असं मी नाय म्हनत. पर यकदा जाऊन तर पहावं. इथं मजूरी करीत बसायचं त्येपेक्षा काय नाशिब निघालं मुंबईला तर निघालं. खरं कीं नाय, माय ?"

"नशीब निघल नाय तर नाय," साळुकीनें उत्तर दिल, "पर चिंता हाय ती तुज्या पर्कुतीची. मबईची हवा अन् पानी कुनाला मानवली तर मानवते नाइ तर..."

"नाइ तर परत यइल की तो," सदोबाने आधार दाखविला, "घर तर हायच."

# — १ —

मुबई म्हणजे मनुष्य जीवनाचा एक अथाग सागर. त्यात विठू म्हणजे एक पाण्याचा इवलासा थेंब !

विठू मुबईस येऊन राहिला तो भगतपूरच्या भावड्या गोंधळ्याच्या खोलीत. कुठे नोकरी करायची, कुठे पोटाला दोन घास मिळवायचे याची त्याला यत्किंचित्‌ही कल्पना नव्हती. पण, मुबईत कुणीही भुकेनं मरत नाही अशी त्याच्या सुप्त मनातली एक जबर आशावादी कल्पना होती. आज ना उद्या कांहीं तरी काम मिळेल अशी त्याला खात्री वाटत होती. पण, कुठल्या तऱ्हेचे काम पहायच ह्याची त्याला स्वतःलाच फारशी स्पष्ट कल्पना नसल्याने तो भावड्या गोंधळ्याला किंवा भगतपूरच्या इतर सोबत्याना काय सागणार ? त्यानींहि अर्थात् पहिले काहीं दिवस नोकरी दाखविण्याचा फारसा त्रास करून घेतला नाहीं. विठूच्या मनांत मात्र त्यालाही न समजणारी अस्वस्थता धुमा-कूळ घालीत होती. आणि म्हणून कसलाच फारसा कसोशीनें विचार न करतां तो मुंबई शहराच्या एकदर वातावरणाशींच फक्त मैत्री करण्यांत दिवस घालवीत होता. दिवसभर कुठेंतरी भटकावं, कुठल्यातरी 'हॉटेला'त चहा घ्यावा आणि जेवावं आणि भावड्या गोंधळ्याच्या खोलींत रात्रीं झोपायला यावं

असा त्याचा कार्यक्रम असे. केवळ निरर्थक अस आयुष्य घालविण्यात, मुंबईच्या अफाट जनसमर्दात अनोळखी अनामिकाच्या महत्त्वशून्यतेने वावरण्यात, त्याच्या मनाची बेचैन वृत्ती किंचित् स्थिरता अनुभवित होती. प्रवाहपतिताच जीवन आपखुषीने जगण्यात त्याला प्रवाहाच्या ओलाव्याची शातता जरी मिळत नव्हती, तरी एक प्रकारची बधिरसज्ञ सथता प्राप्त झाली होती. क्वचित् मात्र ह्या सथतेचा पापुद्रा निघायचा आणि मग प्रवाहाच्या ओलाव्याची विलक्षण जाणीव त्याच्या आतल्या सजीव सज्ञाकातडीला व्हायची.

एकदा असाच विठू ट्रॅमधून सध्याकाळी भावडू गोधळ्याच्या खोलींत परत येत होता. दिवसभर भटकून त्याला थोडा थकवा आला होता. पण तो बसला होता त्याच्या पाठीमागच्या बाकावर दोन दक्षिणी गृहस्थ एकमेकाशीं बोलत होते त्याच्या संवादाने त्याचे लक्ष वेधले. आणि सामान्यत: आपल्याच तद्रीत किंवा तद्रीशून्यतेत ट्रॅममधून प्रवास करणारा विठू नीट ऐकू लागला—

" हां, जागा जरा बाजूलाच आहे. पण इतर जागेपेक्षा जास्त बरं वाटत तिथें."

" बरीच वर्दळ असेल का ? "

" नाहीं. म्हणजे असते—पण मी जातों तेव्हा नसते."

" मला सुद्धा कुठतरी जावस वाटतं. पण ठिकाण नीट मिळत नाही."

" मला हे ठिकाण सांपडून आतां पांच वर्षे झालीं. पण त्यापूर्वी मलाहि कुठं चागल समाधान मिळत नव्हतं. बायको गेल्याला जवळ जवळ दहा वर्षे झालीं. दुसर लग्न करायचा विचार करीत होतो. पण आता हें ठिकाण मिळालं आहे. बरं अगदीं घरच्यासारखं. "

"रोज जाता का तुम्ही तिच्याकडे ?"

"तस रोजसुद्धा जायला हरकत नाही. पण ऑफिसच्च काम वगैरे असत. अन् घरी रोजच पहायचं असतं. कारण, मुल अजून लहानच आहेत. म्हणून रोज जात नाहीं."

"ह—पण मग दुसर गिऱ्हाईक असल गेल्यावर तर ?"

"नाही. तिनं आणि मी हा शनिवारचा अन् रविवारचा दिवस ठरवला आहे. साधारण सध्याकाळी सातच्या सुमारास जातो मी. रात्री शेवटच्या ट्रॅमने घरीं परत येता येत. कारण, ती दुसर गिऱ्हाईक येऊ देत नाही त्यावेळेला, आमच हे ठरल्यापासून. शिवाय इतराच्यासारख ती आता वागवत नाहीं. अगदीं बायकोसारख, केव्हाही गेल तरी नीट व्यवस्था असते. इतक्या इमानाने रहाते ठरलेल्या दिवशीं आता."

"बर सापडलं हे ठिकाण. मी सुद्धा पहातो. म्हणजे इतर त्रास वाचतो."

"हो. अचानक सापडल अगदी. मी सोडणार नाही हे ठिकाण आता. आपल्याला बुवा कटाळा येतो आज एकीकडे उद्या दुसरीकडे अस करण्याचा. हे नीट जुळल आहे. इतकी काळजी घेते ती. कशाला दुसरा उपद्व्याप."

"पण ह्याच्यात इतकं इमान असेल अशी कल्पना नव्हती."

"मलासुद्धा नव्हती. पण ह्या ठिकाणीं मिळत खर समाधान. पुन्हा वेळेची किंवा कसलीहि इतर तक्रार नाहीं. एकाद्या वेळेस उशीर झाला, किंवा जातां आलं नाहीं किंवा जास्त वेळ रहावस वाटलं तरी दुसऱ्या दिवशीं......"

"हं. मलासुद्धां असंच ठिकाण पाहिजे. नाहींतर नुसत पैशापुरत काम म्हणजे मजा नाहीं येत......"

विठूला वरील सवाद ऐकून कौतुक वाटल. त्याचंहि शरीर सूक्ष्मपणे थरारल. ट्रॅम खटकली. आणि विठू आपल्या जागेवरून उठून खालीं उतरला. त्याला तान्हीची आठवण झाली आणि येसूची. त्याच विचारात तो भावड्ड गोंधळ्याच्या खोलींत शिरला. त्याच्या शरिरात उठलेल्या सूक्ष्म लहरींनीं त्याच्या चेहऱ्यावरही जरा तजेला आला होता. त्याबरोबरच त्याच्या सथ चित्तवृत्ति किंचित् खळाळायला लागल्या होत्या. भावड्ड गोंधळी संध्या-काळचं जेवण करून जरा आराम करीत होता. विठू आत येताच भावडू म्हणाला—

"काय, इठू कुठं गेला होता?"

"शिनेमाला," विठूने अगावरच कुडत उतरीत उत्तर दिलं.

"पर जेवण वगैरे केलं का? भाकरी हाय पायजे असल तर."

"नाइ जी. शिनेमा सपून खाऊन बिऊन आलोंय."

'काय, नोकरीचा काइ इच्यार केला का?"

"आता परत नाय. पर आता करावा म्हनतोय. कटाळा आता उगाच हिंडून सगळीकड."

"करायची असल नोकरी तर पहा. माज्या गिरणींत हाअे एक जागा रिकामी."

"गिरणींत काम करायचा इच्यार नव्हता, म्हटलं काइ दुसरं मिळालं..."

"अरे गिरणींत बरं. आपुन सगळे भगतपूरचे माणसं एकमेकांच्या आधारानें एकठिकाणीं होऊन रहाया चांगलं नाहीं कां? कमी आहे, जास्त आहे......"

"गिरनीची जनू भिती वाटतीया..."

"भिती यक दोन दिवसाची, इटू. आमाला नाइ वाटली भिती परथम व्हय!"

"त्ये बी खरं हाय. पन जागा खरंच रिकामी हाय?"

"हाये तर. नाइ तर मग काय मी मस्करी करतोय व्हय"

"कायमची हाय का..."

"कायमची नाय. पर भिकू चव्हाण आपल्या गावाला गेला हाये दोन तीन महिन्याकरता फकस्त. तरीबी यकदा लागला तू म्हजे मग कायमचं पाहून घेता येईल."

"नाई नाई, मला कायमची जागा नकोय..."

भावडू गोधळयाच्या मदतीनें विठूला गिरणीत नोकरी मिळाली. विठूनेही इमानानें काम केल. पण त्याच्या मनातली अस्वस्थता जाईना. कामात त्याने कुचराई केली नाहीं. पण गिरणीच्या त्या यान्त्रिक जीवनात त्याच मन रमेना. आणि बदलीचे तीन महिने संपल्यावर त्याला एकंदर बर वाटल पुन्हा बेकार होऊन मुबईत फिरण्यात. पण निरुद्योगी बेकारपणाची मौजही फार दिवस टिकण मुबईत शक्य नसतं. कारण त्या अवाढव्य शहरात पदोपदीं आण्यापैशाची गरज भासते.

एक दिवस विठूला वाटल रेल्वेस्टेशनवर हमालाच काम करायला सुरवात करावी म्हणून. पण तो विचार त्यानें सोडून दिला. आणि त्याचप्रमाणे इतरही बरेचसे विचार त्यानें सोडून दिले. कारण, काय उद्योग करावा याबद्दल त्याचा त्यालाच निश्चय करता येईना. मधूनच त्याला घरीं आईबाप-आजोबा कडे जाण्याची लहर यायची. पण तीही फार वेळ टिकायची नाहीं. कुठून तरी एक मन त्याला म्हणत होतं कीं परत आई–बापाकडे इतक्यांत जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. दुसरं मन विचारात होतं कीं मग अर्थ आहे तरी कशांत?

याला पाहिल मन उत्तर देणार इतक्यात विठूच्या कानावर आवाज आला—

" काव् काव्...काव् काव्...काव्..."

विठूने नजर वर करून पाहिल. जी. आय् पी. ची त्याची लोकल गाडी कुर्ला स्टेशनवर उभी होती. तो तिच्यातून खालीं उतरला. पलीकडच्या उघड्या मैदानावर एक पांढऱ्या दाढीचा, थोडासा वेड्या पीरासारखा दिसणारा मुसलमान मनुष्य मोठ्याने कावळ्यासारखा आवाज काढीत होता. पक्ष्याची भाषा त्याला चांगलीच अवगत असली पाहिजे अस दिसत होत. कारण त्याची 'काव् काव्' अशी हाक ऐकून कावळ्याचे थवेच्या थवे जवळच्या लिंबाच्या झाडावर येऊन बसत होते, आणि त्या हाकेला प्रत्युत्तर देत आपल्या काव् काव् अशा आक्रोशाने इतर सवगड्याना बोलावीत होते. सुरवातीला फक्त दोन चारच कावळे त्या दाढीवाल्या मुसलमानाच्या हाकेला भाळून तेथें आले. पण त्याची काव् काव् त्या हाकेला साथ द्यायला लागल्यावर लाबलाबून इतर कावळेही काव काव करीत तेथे जमले. तो म्हातारा मुसलमान मध्येच आपली हाक थाबवायचा. त्याची हाक थाबल्यावर थोडा वेळ कावळ्याची काव् काव् चालूच रहायची. मग थाबायची. आणि दोन दोन चार चार कावळे कदाचित आपली झालेली फसवणूक ओळखून उडत उडत निघून जायला लागायचे. असे बरेचसे कावळे उडून जाईपर्यंत तो म्हातारा मुसलमान वाट पहायचा. आणि शेवटीं एकाद दुसराच कावळा राहिला आहे असं पाहून मग पुन्हा आपली "काव काव" अशी हाक द्यायला सुरवात करायचा. त्याची ती आर्त हांक ऐकली कीं पुन्हां लाबलाबून काव् काव् करीत कावळ्याचे थवे उडत उडत यायला लागायचे आणि लिंबाच्या झाडावर बसून काव कावच्या प्रत्युत्तरी कल्लोळानें वातावरण दुमदुमून टाकायचे !

थोड्याशा आपखुशीनें स्वतःवर ओढवून घेतलेल्या बेकारीच्या निरु-द्योगी वृत्तीत विठू वरील दृश्य पहात उभा राहिला. त्याला ते बघून आश्चर्य आणि मौज वाटत होती. काय पक्ष्याची भाषा आहे पहा! सारी दोन तीन अक्षराची किमया!—कीं माया? काव्, काव्, काव्! एक स्वर आणि दोन व्यजने! पण, त्याच्याच फक्त निरनिराळया तऱ्हेच्या उच्चारानी कावळयाच सर्व जीवन रगत असल पाहिजे. नराची मादीला हाक किंवा मादीची पिलाना हाक जायची ती फक्त या एक स्वर नि दोन व्यजनाच्या सहाय्या-नेच. फरक जरा आघात–आदोलनात, उच्चाराच्या ठेक्यात! धोक्याची सूचना, भीतीचा इशारा, भक्ष्याची आनंददायक बातमी, मदतीकरिता पाचारण,—एक ना दोन, काकजीवनातील अनेक व्यवहाराची भाषा म्हणजे ही एक स्वर नि दोन व्यंजनाची. फरक फक्त उच्चाराच्या ढबींत! ह्या असल्या अनेक अर्थापैकी कुठला अर्थ तो म्हातारा दाढीवाला मुसलमान बिनचूक बतावणीने आळवीत होता कुणास ठाऊक. पण, त्याची 'काव काव'ची नक्कल यशस्वी होत होती खरी. आणि बिचारे कावळे त्याच्या भुलावणीला फसून फडफडत तेथे येऊन झाडावर बसत होते. विठूला कोड पडत होत की या विशिष्ट प्रकारच्या उच्चारातून ती एक स्वर नि दोन व्यजनाची भाषा कुठला विशिष्ट अर्थ ध्वनित करीत होती!

विठूचं कोडं हे शिकल्या सवरल्या पढीकाचं कोडं नव्हतं. त्यांत कोड्यापेक्षा कौतुकाचा आणि अडाणी कुतूहलाचाच भाग अधिक होता. पण त्याच्या या अडाणी कुतूहलाला विदग्ध स्वरूपांत निदान सोयीच्या दृष्टीनें तरी येथे माडायला हरकत नाहीं. पक्ष्याची भाषा काय किंवा मनुष्याची भाषा काय, दोघींचीही संपत्ति स्वर आणि व्यंजनांची. दोघींचीहि मदार संकेतावरच. आणि सकेत म्हटला कीं भुलावणी आलीच. म्हाताऱ्या दाढीवाल्या मुसल-

मानाने 'काव काव' हाक मारली तरी आपल्याचपैकी एकाची हाक समजून जमतात कावळ्याचे थवेच्या थवे! मुबई शहरसुद्धा अशीच हाक मारत! पण कुणाला आणि कशाकरिता? विठू जर वाङ्मय विशारद असता तर तो म्हणाला असता की तो पहात असलेल दृश्य सबंध मानवी जीवनाच एक प्रकारे प्रतीकच होत. हाका ऐकू येतात. पण कुणाच्या आणि कशाकरिता? सगळाच असा फसवणुकीचा मामला! कावळे मात्र काव् काव् करीत फडफडत येतात. पण, कुणाच्या हाकेला ओ देत? आणि शेवटी, या अफाट विश्व-विनोदाच हास्य कोणत्या 'पाढऱ्या दाढीच्या मुसलमाना'च्या चेहऱ्यावर झळकत कोण जाणे!

काव्...काव्...! एक स्वर नि दोन व्यजने!
भाषा नि विचार!
पाढरा दाढीवाला नि कावळे! हंसा आणि फडफडा!
एकाची गंमत नि सगळ्याची काव् काव्...!

अशिक्षित विठूला कदाचित् अशा रीतीने स्वतःच्या मनातील कुतूहलाची जाणीव स्पष्टपणे झालीहि नसेल. कारण, सुशिक्षित विचारवताच बुद्धिकाम नक्षीदार महिरापीसारख असतं, तर अडाणी मराठ्याचं बुद्धिकाम ओबडधोबड पुतळ्यासारख असत. पण बुद्धिकाम नक्षीदार असल काय किवा ओबडधोबड असलं काय दोहोंचा आशय मूलतः तोच असतो. विठूच्या संज्ञाप्रवाहात ओबडधोबडपणे तरंगत असलेला हा आशय त्याच्या गात्रागात्रांतून हळूं हळूं पसरायला लागला होता.

इतक्यात पावसाची एक जोराची सर आली. त्यासरशीं तो पाढरा दाढीवाला मुसलमान अदृश्य झाला. आणि लिंबाच्या झाडावरले कावळे पानांतल्या पानांत लपून बसून पाऊस चुकवता चुकवता स्तब्ध झाले. त्याच्या काव् काव्चा कलकलाट थाबला. कुर्ल्याच्या रस्त्यात पाण्याचे छोटे ओढे वाहूं

लागले. विठूही पाऊस चुकवण्याकरता म्हणून स्टेशनात शिरला. समोर पहातो तो शिंद्याची येसू.

" इकड कुठ तुमी ?" येसूनं आश्चर्याने विचारलं.

" इकड कुठ !...इसरलो की !.. पर आता तुमी दिसल्याती तवा तुमच्याचकड नव का ? विठूने हसत हसत उत्तर दिलं. त्याला वाटल या क्षणाला नुसतच 'काव् काव्'—पण एका विशिष्टार्थाच्या लकबीन–उच्चारता आलं असत तर किती बर झाल असत. कुठ एक स्वर नि व्यजने यावर नाचणारी पक्ष्याची भाषा नि कुठे आपला दहाबारा स्वर नि पचवीस तीस व्यजनें याचा फुटकळ पसारा ! किती हाका ऐकू येतात रोज ! त्या सर्वांना या फुटकळ पसाऱ्याची जुळवाजुळव करून उत्तर देत बसायच म्हणजे नुसता द्राविडी प्राणायाम, नाही तर अवाढव्य कूट-प्रपच ! त्याच्या अर्धजागृत मनात पडसाद उमटला 'काव् काव्', पण त्याच्या तोंडातून शब्द बाहेर पडले—

" अन् तुमी इकडं कुठ ? सितळगावला थोरल्या बहिणीकडे व्हताना आईबरोबर ?"

" इकत तरी ध्यानात हाय, आमच नशीब म्हनायच ! पर् थोरली बहिण झाली तरी आमा बायकास्नी तिच्याकड काइ जनमभर रहाया येत नाई." येसू म्हणाली.

" मग इथं एकल्या आल्याती व्हय ? अन कुठशीक रहाताय ?"

" घर हाय शींवच्या बाजूला. अन आमचा मानसं हायती त्येना पोस्ट हपीसात हाय तिथ नोकरी. आईबी आलीया इथ रहाया आमच्यासग थोड्या दिवसापुरती."

'काव् काव्'–विठूच्या अर्ध जागृत मनात पडसाद उमटला. आणि त्याच्या तोडांतून शब्द आले—

"इकडं कुठ कामाला चालल्याती व्हय?"

"व्हय."

"कुठं हाय काम?"

"या कुर्ल्याच्या आगपेटीच्या कारखान्यात. ह्या महिन्यापासनच घेतलय ह्ये काम."

कुर्ल्याचा आगपेटीचा कारखाना!—काव् काव्च्या कलकलाटात विसरलेल्या गोष्टीचं विठूला स्मरण झाल. मुबईला आल्यावर मनाच्या बेचैन स्थितींत अर्धवट स्वेच्छेनेच स्वीकारलेला बेकारपणा हळू हळू कायमचाच विठूला चिकटू पहात होता. आपल्या असमाधानाचं मूळ कशात आहे हे विठूलाच समजत नव्हत. पण जोपर्यंत खिशात थोडे पैसे होते तोपर्यंत या असमाधानी बेकारीची फारशी फिकीर नव्हती. दिवसामागून दिवस जायला लागले. तेव्हा शेवटी काहीं ना काही तरी उद्योग करावा असा अर्धाकच्चा निश्चय विठू करू लागला. पण नोकरी मिळायचं चिन्ह दिसेना. कारण, पाहिजे तशी नोकरी मिळेना, आणि मिळेल तशी नोकरी घ्यायला आवडेना. ह्या मनःस्थितीतच भावड्या गोधळ्याच्या सागण्यावरून विठू कुर्ल्याच्या आगपेटीच्या कारखान्यात काहीं काम मिळेल का हें पहाण्याकरिता कुर्ल्याला आला होता. येसू त्याच कारखान्यात काम करीत होती हें ऐकून त्याच्या प्रयत्नांतील उत्साह विरला.

"कुर्ल्याच्या आगपेटीच्या कारखान्यात! वाः मी बी तकडंच नोकरी शोधाया जात व्हतो कीं."

"मग, आतां इच्यार फिरला व्हय!"

"आता नाइ बी नोकरी मिळली कारखान्यात तरी पर्वा नाय! तुमची भेट झाली हये नोकरीपेक्षां बी..."

पण त्याचं वाक्य सपायच्या आत विठूच्या अर्धजागृत मनाने साद दिला—काव् काव्...

अंतर्मनाच्या काव् काव्च्या कलकलाटातच विठू येसूच्याबरोबर कुर्ल्याच्या आगपेटीच्या कारखान्याजवळ आला. आणि त्याने येसूचा निरोप घेतला.

" आत यावा न मॅनेजरसायबास्नी भेटाया " येसू म्हणाली.

" आज जाऊ द्या आता. उद्या परवा यईन पुन्हा," विठू उत्तरला. " त्ये निमित्ताने तरी तुमची आणखी भेट व्हइल नव का ! "

" ओ येसू , येसू अग किती वकत झालाय अन् ती गंगा बी आली नाय बया. अग कामाला लागायच हाय का सुट्टी घ्येयाची हाय ! " एका वजनदार बाईचा आवाज आला.

त्याच्याचबरोबर दाराजवळच्या एका खोलीतून पारशी मॅनेजरचा आवाज आला—

" आमी तुमचा लोकाचा भरवसा धरते. अन् सगळा लाकूड स्टेशन-वर यऊन पडला चार दिवस झाला, पन् तुमी गाडीवाला लोक अजून आणत नाई. आमचा काम रहाते आणि नुकसान रोजचा किती होते...—"

"एटली एजन्सीना माटे तमे कइ बी करो शेटजी, दुसरीकडून आणखी एक आवाज आला. " अरे तमे कमीशनना सू हिसाब करोच. हू कइ वधारे केहवानो नई पन तमे जोइओ तो खरी छ महिनामा तमारो आग-पेटीना सेल केटला थसे उत्तर हिंदुस्तानमा. सोल एजन्सी..."—

ह्या आणि अशाच इतर आवाजाच्या गलबल्यात विठूनें येसूला राम राम केला आणि तो परत कुर्ल्याच्या स्टेशनवर येऊन जी. आय. पी. च्या लोकल गाडीमध्यें बसला. थर्डक्लासच्या त्याच्या डब्यात चिकार गर्दी होती. प्रत्येकजण आपआपल्या रीतीने कुठल्या तरी 'पांढऱ्या दाढीवाल्या'च्या

हाकेला काव् काव्चा साद देत चालला होता. विठूला मात्र आपल्याला कुठल्या आणि कसल्या हाका, कोण आणि कुठला 'पाढरा दाढीवाला' मारीत आहे याची नीटशी जाणीव होईना. एक स्वर नि दोन व्यजनें ! पण तीं उच्चारायचीं कशीं आणि पख फडफडत उडायच कुठे ? प्रवाहपतित विठूच्या बधिर–सज्ञ सथतेचा पापुद्रा किंचित् निघाला आणि तिच्या आतल्या सजीव सज्ञा–कातडीला प्रवाहाचा ओलावा थोडासा जाणवला.

त्या मनःस्थितींतच विठू परळला जाण्याऐवजीं शींवच्या स्टेशनवरच उतरला. त्यात शीवला येसूच घर आहे ह्याची जाणीव असलीच तर त्याच्या मनाच्या अगदीं खोल अशा सुप्त थरात. शीवला उतरण्याचा त्याचा उद्देश अगदीं निराळा होता. त्या उद्देशाच्या रोखोंन तो निघाला आणि शीव ते दादर जाणाऱ्या डाबरी रस्त्याला लागला. थोडस चालल्यावर, रस्त्याच्या डाव्या बाजूला असलेल एक लहानस देऊळ लागल. तिथे विठू आत शिरला. देवळात त्यावेळेस पुजारी किवा दुसर कोणीही नव्हतं. कुर्ल्याला पाऊस पडला. तरी शीवच्या पलीकड ऊन होत. पण देवळाभोंवतालच्या झाडीने देवळात गारवा आणला होता. विठूने आत शिरून देवापुढे डोक ठेवल. नंतर मान वर करून त्याने त्या सगमरवरी मूर्तीकडे बघितलं. त्या मूर्तीचे कपडे, तिच्या अगवरचे खोटे दागिने, तिच्या पुढील तादूळ, नारळ, सुपारी —त्या एवढ्याशा देवळातील चार पाच गोष्टीकडे त्यानें निरखून पाहिलं. मग त्या देवाच्या मूर्तीच्या दगडी डोळ्याकडे टक लावल. त्याच्या अर्धजागृत मनांतून अनेक आणि अनेक प्रकारच्या उच्चारात काव् काव्चा गलबला उडाला.

आणि कापऱ्या ओठानीं, दबलेल्या आवाजात, काव् कावची एक स्वर नि दोन व्यंजने उच्चारीत विठू प्रश्नांकित मुद्रेनें रडला.

देवळातून बाहेर आल्यावर दाराशीच थोडा वेळ विठू संथपणें बसला. नतर उठून तो परत शीवच्या स्टेशनवर आला आणि जी. आय. पी. च्या लोकलने परळला पोहोचला.

भावडू गोधळ्याच गिरणीत उत्तम चालल होत. छोटासा हुद्दाहि त्याला तिथे मिळाला होता. त्याच्या मदतीने भगतपूरच्या जुन्या नव्या मडळीपैकी आठ दहा जणानाही त्या गिरणींत सुखासमाधानाची भाकरी मिळत होती. पण विठू मात्र आणखी कांही दिवस बेकारच राहिला. पुढे १९३९ साल अर्धआधिक उलटून गेल्यावर दुसऱ्या महायुद्धाची रणशिंगं फुकली गेलीं. सर्व तऱ्हेच्या उत्पादन साधनाचीं चाकं दुप्पट वेगानं फिरूं लागली. बेकाराना दोन घास पोटात घालून साकार व्हायची संधी आली. आणि साकाराना निराकारात विलीन होण्याची पर्वणी पाहिजे असल्यास सैन्य-भरतीनें ती दाराशीं आणून उभी केली.

भावडू गोधळ्यान दिलेली विडी ओढीत विठूनें त्याला सांगितल कीं, मुबईत काम करीत रखडत बसण्यापेक्षा आपण सैन्यात जाणार म्हणून. त्या-प्रमाणें तो मुंबईहून निघाला आणि साळुकी, तुकाराम व म्हातारा सदोबा याची परवानगी घेण्याकरिता पुण्याहून " विजेच्या गावीं " आला. बेकार मुलगा परत आला तरी आईबापाना व आणि आजोबाला आनदच होणार. त्याप्रमाणे तो झालाही. पण त्यात विठूचा सैन्यांत जाण्याचा विचार ऐकून थोड्या काळ्या रेषा उमटल्या. साळुंकीला १९१५ सालची आठवण झाली. त्यांत म्हाताऱ्या सदोबानं सांगितलं कीं, समाधानाची गोष्ट म्हणजे विठू घरच्या मंडळींना विचारून जात होता. बापाप्रमाणें न कळवितां गेला असता तर किती काळजी वाटली असती. प्रत्येकाचं नशीब प्रत्येकाबरोबर येतं नि जात. त्यांतल्या त्यात आजूबाजूच्या लोकांना कमी काळजी लावली म्हणजे बरं. तुकारामला लढाईचा अनुभव होता. त्यानें बेकारींतून सुटण्याकरितां

म्हणूनच केवळ सैन्यात भरायची जरूरी नाहीं अस विठूला सागितल. पण शिरक्याच्या घराण्यात शिपाईगिरीचं वाण उचलायला कुणीही कधींही मना करणं शक्य नव्हत. त्याप्रमाणें विठूलाही कुणी अडकाठी केली नाही. विठूला मोठा आनंद झाला अस नाहीं. पण बर वाटल.

"विजेच्या गावी" दोन चार दिवस राहून विठूने त्या गावाला रामराम केला. तुक्याने त्याला स्वतःची काळजी घ्यायला सागितल. पैसा अडका लागला तर मागायला सागितल. साळुकीच्या डोळ्याना पाणी आलं. म्हाताऱ्या सदोबाने तिला पोटाशीं धरल आणि धीर दिला. तुकाराम नाही का एकदा परत आला लढाईवरून, तसाच विठूही येईल. माणसाची माया कुठवर जाणार! मग रडण्यात काय अर्थ आहे बरं?

विठू तिथून निघाला आणि पुण्याच्या स्टेशनवर आला. मुंबईच्या गाडीला अजून अवकाश होता. त्याने थर्ड क्लासच तिकिट काढल आणि स्टेशनात येऊन ज्या प्लॅटफॉर्मवर मुंबईकडची गाडी येणार होती त्या प्लॅट-फॉर्मच्या एका कोपऱ्यात तो येऊन बसला. जवळ फक्त एक लहानस कप-ड्याचं बोचक. शेवटी एकदाची गाडी प्लॅटफॉर्मवर आली. विठू गाडीत चढला आणि आपलं कपड्याचं बोचकं उशाला घेऊन, पाय आखडून निजला.

मुंबईला परत आल्यावर तो सैन्यभरतीच्या कचेरीत गेला. तेथील अधिकाऱ्याने विचारलं—

"नाव?"

"नाव इठू तुकाराम शिर्के." विठूने अदबीने उत्तर दिलं आणि त्याला खंडू मास्तर व त्यांची हजेरी याची आठवण झाली.

"नाव इठू तुकाराम शिर्के, बापाचं नांव?"

" बापाचं नाव तुकाराम सदोबा शिर्के. "

" बापाचं नाव तुकाराम सदोबा शिर्के. वय ? "

" वय कुणाचं—माझं का बापाचं ? "

" तुझं वय ? "

" वय उमर वर्स तेईस चोईस."

" रहाणार ? "

" रहाणार वस्ती इजेच्या गावी. "

" विजेच्या गावी ? विजेच्या गावी म्हणजे कुठे ? "

" इजेच्या गावी नव का म्हजे...नाई, भगतपूर लिवा वस्ती. "

" विठू तुकाराम शिर्के, वय वर्षं २३, रहाणार भगतपूर. "



" पा ऽ पू ! पा ऽ पू ! पापूऽऽ ! "

" सूऽ ऽ ! "

" आवो ! "

" आता ! "—

भाताचीं खाचरं पाण्याने गुडघ्याइतकीं भरली होती. त्यात एक पाढरी शॉर्ट किंवा अर्धी विजार घातलेला आणि अंगांत बिनबाह्याचा गजीफ्रॉक असलेला " पापू " वाकून उभा होता आणि वाकल्या वाकल्या " आता " किंवा येतो आहे असं उत्तर मोठ्या आवाजात देत होता. सध्याकाळ झाली असल्यानें सूर्याचं तांबडं बिंब पश्चिमेच्या क्षितिजावर टेकल होत. त्यांच कोमल किरण तोंडावर घेत, त्या भाताच्या शेताच्या बाजूलाच जरा उचावर असलेल्या शेतकऱ्याच्या झोपडीच्या दारात उभी राहून, " सू " पापूला हांक मारीत होती. सूच्या हांकेंत गोडी होती, पण तिला लाडिकपणाची किनार नव्हती. किंवा, असलीच तर पापूला ओळखू येईल अशा तऱ्हेची तरी निदान ती नव्हती. पापूनें खाचराच्या पाण्यांत आपले हात खळखळले, आणि तो एक पाय पाण्यातून काढीत खाचराबाहेर येऊं लागला. तो येतो आहे अशी खात्री झाल्यावर सू झोपडींत गेली.

'सू' ही वीस एकवीस वर्षांची एक तरुण मुलगी होती. ती झोपडी आणि तिच्या लगतची भाताची खाचर ज्या ब्रह्मी शेतकऱ्याच्या मालकीचीं होतीं तो तिचा बाप होता. त्या दोघांशिवाय त्या झोपडीत फक्त एक पापूच होता. पण झोपडीच्या नजीक असलेल्या गावात मात्र सूचे कांहीं मित्र आणि तिच्या वडिलाचे काहीं नातलग होते. त्याच गावात लहानपणीं सू वाढलेली. पण तिची आई वारल्यानतर गावातल घर सोडून देऊन ती आणि तिचे वडील आपल्या शेतावरच झोपडी करून रहात होते. शेतावरचा भात काढून ते आपली गुजराण करीत होते. दुसरं महायुद्ध सुरु झाल्यावर त्यात उडी टाकून जपान्यानी ब्रह्मदेश काबीज केला. पण सोयीच्या दृष्टीनें प्रथमच दहशतीकारिता थोडासा धाकदपटशा करून, नतर त्यानी त्या गावाला त्रास दिला नव्हता. गावात पिकणाऱ्या भाताचा मात्र जपान्यानीं कबजा घेतला होता. आणि मिळेल तेवढा भात घेऊन पुढें पिकणाऱ्या भाताची वासलात कशी लावायची याचाही त्यानी बदोबस्त करून ठेवला होता. काटेकोरपणानें पोटाला पुरेल इतका भात त्या गावातील इतर लोकाप्रमाणे सूला आणि तिच्या वडिलानाही आपल्यासाठी ठेऊन घेता येत होता. जपानी आक्रमणा-नंतर त्या गावातील लोक एकमेकाशी अधिकच दृढतेनें निगडीत होऊन राहू लागले. सू आणि तिचे वडील एवढेच त्या झोपडींत प्रथम होते. कारण, पापू त्याना येऊन मिळाला तो नतर कांही महिन्यानीं. तों पर्यंत त्याना सोबत म्हणून सूचा एक चुलत भाऊ आणि त्याचा एक मित्र असे दोघे सूच्या वडिलाच्या झोपडीवर निजायला आणि रात्री सोबत करायला येत असत. बाकी दिवसा त्याना विशेष सोबतीची जरूरी नसे. कारण शेतावर काम करणाऱ्या मजुराचीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत सथ वर्दळ असायचीच.

सू स्वतः शेतावर काम करीत नसे. पण झोंपडींतल सगळं काम आणि स्वयंपाक वगैरे मात्र ती आपल्या हातानेंच करायची. स्वभावानें ती

जितकी तडफदार मुलगी होती तितकीच मनमिळाऊही होती. त्यामुळें जपानी आक्रमणाने उत्पन्न केलेल्या वावटळींत आणि धोक्याच्या जीवनातही तिने आपल्या झोपडीत त्याचप्रमाणे आपल्या मित्रनातलगाच्या परिवारात उदासीनतला फारस डोकावू दिल नव्हत. संध्याकाळच्या वेळेला सूच्या वडिलाकडे गावातली मडळी यायची. आणि हलक्या आवाजात युद्धाच्या गप्पा मारायची इच्छा असूनही इतरच शिळोप्याच्या गप्पा मारायची. पण त्यात मधून मधून कुठे काय झाल किवा होत आहे याबद्दल साकेतिक शब्दानी देवघेव अगदीच होत नसे असे नाहीं. आणि या साकेतिक देव-घेवीने वातावरण किंचित् अवघड होऊ लागल म्हणजे सूच्या वडिलाची तिला उगीचच हाक जायची. पण ती 'सू' म्हणून नव्हे. कारण, 'सूचं खर नाव 'सू' नव्हत. आणि पापूखेरीज इतर कुणी तिला 'सू' या नावाने ओळखीतही नव्हतं.

'सू' हें जसं सूच खरं नाव नव्हत तसंच 'पापू' हेही पापूचं खरं नाव नव्हतं. फरक इतकाच कीं सू हे तिच खर नाव नसल तरी सू ब्रह्मी होती. पण पापू पापूही नव्हता आणि ब्रह्मीही नव्हता. तो होता खरा हिंदी आणि त्याच खरं नाव होत विठू तुकाराम शिर्के, रहाणार भगतपूर, पलटण न. * * ६ *. विठू १९४० मध्ये सैन्यात शिरला आणि १९४३ च्या सुरवातीला प्रथम ब्रह्मदेशात उतरला. हिंदुस्तानची सरहद्द ओलाडून दोस्त सैन्य बगालच्या उपसागरालगतच्या ब्रह्मदेशाच्या किनाऱ्याच्या आसऱ्यानें जपान्या-वर हल्ले करीत होतं आणि त्यानी रुतवलेला आक्रमणाचा पाय ब्रह्मदेशांतून काढून घ्यायला लावायचा प्रयत्न करीत होत. त्यात एकदा एक टेपाड सर करायचं काम एका ब्रिटिश तुकडीकडे दिल होतं. हल्ल्याला सुरवात अगदीं बरोबर पहाटे घव्याळात पाचाचे ठोके पडताच झाली. पण शत्रूची शक्ति किती आहे याचा अंदाज नव्हता. शिवाय जी शक्ति होती ती शत्रुने कशी

विखरून ठेवली होती याचीहि नीटशी कल्पना करता येत नव्हती. अशा परिस्थितीत ज्या ब्रिटिश तुकडीने हल्ला केला त्या तुकडीतील प्रत्येक शिपाई प्राण पणाला लावून लढला तरी ते टेपाड सर व्हायचा रग दिसेना. तुकडीतील जवळ जवळ सर्व प्यादीं त्या दिवशी कामाला आलीं किंवा जखमी होऊन पडली. तेव्हा शेवटी, त्याना खेळवणारा ताबडाबुद, घामाघूम झालेला अधिकारी ओळखून चुकला की आजचा दिवस आपला नाही. नामोहरम होऊन त्याने उरलेली प्यादी मागे घेतली आणि दुपारी बारा वाजता त्या टेपाडाचा नाद सोडला.

पण ते टेपाड सर केल्याशिवाय दोस्त आघाडी पुढे सरकण शक्य नव्हत. आणि नुसत जिवावर उदार होऊन कितीही लढल तरी जोपर्यंत शत्रूच्या शक्तीचा नि तिच्या छुप्या रचनेचा कयास बांधता येत नव्हता तोपर्यंत त्या लढण्याचा काही फायदा होण शक्य नव्हत. त्या टेपाडावर ज्या ब्रिटीश तुकडीने हल्ला केला होता तिच्यात दुसरा हल्ला चढविण्याची कुवतही उरली नव्हती. कामाला आलेल्या प्याद्याची जागा भरून काढायला आणि तुकडीतल्या शिपायाची सख्या पूर्ववत् व्हायला कुमक हवी होती. ती येईपर्यंत होती ती आघाडी धरून बसण तिला अपरिहार्य होत. पण तिच्याबरोबरच एक हिंदी तुकडी होती. पलटणीवरच्या सेनानीने विचार केला कीं ह्या तुकडीलाही हल्ल्यावर धाडण म्हणजे जाणून बुजून तिला आत्मयज्ञ करायला लावण्यासारख होतं. आणि ब्रिटिश कट्टया तुकडीच्या दुर्दशेने शहाणा होऊन त्यानें तसलं साहस करण्याचा मूर्खपणा बाजूला ठेवला. त्या ऐवजीं पहिली गोष्ट करायची ठरविली ती ही की शत्रूच्या आघाडीची आणि आघाडीवरील बलाची माहिती मिळवायची. हें काम त्याने बरोबरच्या हिंदी तुकडीकडे दिलं. हिंदी तुकडीवरच्या लष्करी अधिकाऱ्याने ती कामगिरी स्वीकारली आणि आपल्या तुकडीतील चार शिपाई निवडून त्याच्यावर ती

सोपविली. त्या चार निवडक गड्यात विठू तुकाराम शिर्के एक होता. रात्र पडल्यावर चार निरनिराळ्या बाजूनीं ते चार सैनिक लपत लपत निघाले. हळूं हळूं त्यानी दोस्त आघाडी आणि शत्रूची आघाडी यातली जमीन कापली. टेपाडाच्या पाठीमागें जाऊन जिवावर उदार होऊन शत्रूकडील माहिती मिळ-वायची म्हणजे धाडस, धैर्य, प्रसंगावधान, धूर्तता नि शात डोकं ठेवण याचा एक प्रयोग होता.

कुठल्याही तऱ्हेची चाहूल लागू न देता त्या चार हिंदी सैनिकानी शत्रूच्या आघाडीची सीमा ओलाडली. इतक्यात त्याच्यापैकी एकाचा पाय एका निजलेल्या कुत्र्यावर पडला. त्यासरशी तो कुत्रा ओरडून पळाला नि एक जपानी गोळी त्या हिंदी शिपायाच डोकं भेदून गेली व तो जमिनीवर पडला. त्या आवाजाबरोबर शत्रूची सारी आघाडी सावध झाली आणि ठिकठिकाणच्या जपानी सेंट्रीची बदूक रोखली गेली. त्यापैकीं आणखी एका बदुकीला दोस्ताच्या चार हेरापैकी दुसरा हेर बळी पडला. त्यानतर पटापट बदुकीचे बार रात्रीची काळी हवा कापीत बाहेर पडूं लागले. दोस्ताच्या तिसऱ्या हेराने शत्रुची आघाडी सोडून आपल्या आघाडी-कडे धूम ठोकली. त्याच्या पाठोपाठ जपान्याच्या गोळ्या इतस्ततः येऊन पडत होत्या. शत्रुला आपली चाहूल लागली हे पाहून विठू धसकला. पण लगेच त्यानें प्रसंगावधान राखून लपल्या जागीच विचार केला कीं आपण परत फिरलो तर आपल्या पाठोपाठही जपानी गोळ्या येणारच. त्यापेक्षा जोपर्यंत शत्रुच्या सावध सेंट्रीची निशाणबाजी नि कान समोर दोस्ताच्या आघाडीवर केंद्रित झालीं आहेत, तोपर्यंत शत्रुच्या आघाडीच्या आतच त्या सेंट्रीच्या पाठीमागें बरोबर विरुद्ध दिशेने पळावें हें जास्त बरें. कारण, समोर जोपर्यंत त्यांच्या बंदुका रोखल्या आहेत तोंपर्यंत त्याच्या पाठीमागें पळणाऱ्या विठूकडे त्यांचं लक्ष्य जाणं असंभवनीय होतं. विशेषतः दोन हेर मरून पड-

लेले आणि तिसरा समोर पळत असताना पाठीमागे आणखी चौथा आपल्या आघाडीच्या जबड्यातून बाहेर पडण्याऐवजी अधिकाधिक आत शिरत असेल अशी त्याना शका येण अशक्य होत. ह्या सर्व गोष्टींचा क्षणाधांत विचार करून विठूने दोस्ताची आणि शत्रूचीही आघाडी मागे टाकून सरळ पुढे नाकासमोर धूम ठोकली.

थोडा वेळ शक्य तितक्या वेगाने पळाल्यावर विठू अगदी गर्द अधा-रात एकेठिकाणी लपून बसला. नतर त्याने आपल्या अंगावरचा लष्करी पोशाख काढला आणि नीट गुंडाळून कोट एकीकडे व विजार एकीकडे असे, जमिनीत खड्डु खणून त्यात पुरून ठेवल. अंगात फक्त एक गजीफ्रॉक आणि कमरेला चड्डी असा मग तो दबकत दबकत पुढे चालू लागला. सकाळ होईपर्यंत तो जपानी आघाडीच्या पाठीमागे जवळ जवळ दहा पधरा मैल जाऊन पोहोचला. आणि एका लहानशा ब्रह्मी गावात शिरला. तेथे थोडीशी भीक मागून त्याने क्षुधातृष्णा शात केली, आणि कमी अधिक विचार न करता तो आणखी तसाच पुढे चालू लागला. रस्त्याने लागलेली एक नदी ओलाडून तो पलीकडे जाताच त्याला एक स्त्रीचा खोल, दबलेला आवाज ऐकू आला. क्षणभर तो तसाच जमिनीला खिळून उभा राहिला आणि ज्या बाजूनें तो आवाज येत होता त्या बाजूला लपत लपत हळू हळू पुढे सरकू लागला. चार पावल पुढे गेल्यावर त्याला दिसलेल दृश्य म्हणजे एका गवताच्या गंजीच्या आडोशाला एक जपानी शिपाई एका ब्रह्मी तरुणीवर अत्याचार करण्याचा प्रयत्न करीत आहे हे! त्या जपानी शिपायाची पाठ विठूकडे होती. त्याची संभोग इच्छा आता आपण तृप्त होणार या भावनेनें अधिकच अधीर झाली होती. त्या जपानी शिपायाच्या तसल्या समोहित, अधीर अवस्थेत विठूनेही गवताच्या गजीचा फायदा घेऊन त्याच्यावर अचा-नक उडी घातली, आणि त्याच्या मानेला विळखा घालून त्याला जमिनीवर

उताणा पाडला व त्याचा गळा दाबला तो प्राण जाईपर्यंत. ती ब्रम्ही तरुणी कपडे नि लज्जा सावरून, तोंडातला बोळा फेकून देऊन उठली. विठूने त्या जपानी शिपायाला उचलून गवताच्या गंजींत टाकल. त्या ब्रम्ही तरुणीने विठूला न समजणाऱ्या भाषेत कृतज्ञता व्यक्त केली, आणि त्याला आपल्या बरोबर यावयास सागितल. त्याने खुणेनें तिला कळविल की, गवताची गजी पेटवून त्या मृत जपानी शिपायाला अग्नि दिला पाहिजे, नाही तर संकट ओढवायचं. त्याप्रमाणें त्या ब्रम्ही तरुणीने घरी जाऊन आपल्या वडिलाना व मित्राना कळविल आणि सर्वांनीं येऊन त्या गजीची मोठी चिता पेटवून दिली.

ती ब्रह्मी तरुणी म्हणजे सू. त्या प्रसगानतर विठू सूच्या वडिलाच्या झोपडींतच राहिला. एकदा त्याच तिथल वास्तव्य पाहून गावातून जाणाऱ्या एक दोन जपान्यानी जरा कसोशीने चौकशी केली. पण शेतावर काम करा-यला ठेवलेला एक फार जुना नोकर म्हणून सूच्या वडिलानी त्याच वर्णन केलं. आणि ब्रम्हदेशात हिंदी लोक युध्दापूर्वी होते त्यापैकीं तो एक मायदेशाला परत न गेलेला गरीब सामान्य मजूर आहे अशी समजूत करून दिल्यानें त्याबद्दल पुढें कुणी फारसं कुतूहल दाखवल नाहीं. विठूने लहानपणी शेतावर काम केल होत. पण भाताच पीक काढायचं त्याला माहीत नव्हतं. सूच्या वडिलाच्या शेतावर काम करणाऱ्यानीं त्याला ते शिकवलं. आणि विठू उत्साहानें तें शिकला. त्यात त्याला जितकं यश आलं तितकं ब्रह्मी भाषा शिकण्यात मात्र आल नाहीं ! सूने त्याला ब्रह्मी भाषा शिकविण्याचा आणि त्यानें तिला मोडकी तोडकी हिंदुस्थानी भाषा शिकविण्याचा प्रयत्न केला. त्यांत विठूची शिष्य म्हणून प्रगति शून्यच झाली, पण शिक्षक म्हणून त्यानें चांगलेच यश मिळवले असं म्हणायला हरकत नाहीं ! कारण, सूला कशीबशी हिंदुस्थानी भाषा तरी समजू लागली आणि तसल्याच भाषेंत खुणाच्या सहाय्यानें

विठू आणि त्याचे ब्रह्मी मित्र एकमेकाशीं व्यवहार करीत होते. ‘सू’ हे विठूने ठरविलेले त्या ब्रह्मी तरुणीच नाव होत. आणि ‘सू’ ने विठूला ‘पापू’ हे नाव दिल होत.

भगतपूरात म्हाताऱ्या सदोबाच्या जोधळा पिकवणाऱ्या शेतातील काळ्या मातीचीं ढेकळ हातात घेऊन, बालिश उत्साहाने जमिनीची मशागत करीत असताना सतरा वर्षाच्या विठूला आपल्या अत:करणातील शेतकरी भावनेचे स्वरूप कदाचित् स्वत:लाही स्पष्टपणे आकलन झालं नसेल. आज सत्तावीस वर्षाचा पापू बनून तोच विठू पुन्हा धरणीमातेशी निगडीत होत होता. भाताच्या खाचरात गुडघाभर पाण्यात उभे राहून, हातावर कोपरापर्यंत चिखलाच पुण्य लेण चढवून त्याकडे कौतुकाने बघत असताना; किंवा पिकलेल्या भाताच्या पिवळ्या सृष्टीतून उमलणारा मद सुवास उल्लेल्या अत:करणाने फुफ्फुसात सथपणे ओढताना विठूला धरणीमातेच्या सहवासाच, तिच्या मशागतीतील सुखद भावनेच खरं स्वरुप आजही किती स्पष्टपणे कळल असेल, कुणी सागावं ! पण त्याच्या चेहऱ्यावर मात्र, पावसाचे थेंब शरीरावर पडावे तसे, हुरुप आणि आनंद याचे थेब बहरून येत होते.

धरणीमातेच्या स्पर्शाने आतां रोज थरारणार पापूचं शरीर सूच्या लज्जाकपित अशा प्रथमदर्शनानेही असच थरारल होतं, उत्तेजित झाल होत. पण गवताच्या गंजीजवळ पापूच्या शरीरातून थरारलेली अभिलाषी लैंगिक भावना हळू हळू आपलं संभोगस्वरुप बदलून एका निराळ्याच स्वरूपात पापूला आनदवू लागली होती. त्या भावनेच्या या स्वरूपात पापूच्या डोळ्याना जेवतांना, गोष्टी करताना किंवा काम करताना जशी मनोहर सवेद्यता प्राप्त होत असे तशीच त्याच्या त्वचेलाही सहज होणाऱ्या सूच्या स्पर्शात तितकीच मनोहर सवेद्यता येत असे. कृष्णेच्या थंडगार पाण्यांत सूर मारल्यानंतर अंगाला बिलगणाऱ्या पाण्यासारखं सूच सान्निध्य विठूला बिलगू लागलं.

त्याबरोबरच आपल्या मुलीला सकटातून सोडवणारा मराठा गडी म्हणून विठूला सूच्या वडिलाच्या कृतज्ञतापूर्ण वात्सल्याचा आसराही मिळाला.

जपानी आक्रमणाच्या वाऱ्यानी सभोवतालच एकदर वातावरण बधिर आणि जडच झालेल होत. अघटित आपत्तींच्या धोक्याने तें नेहमी बुजलेलच, दडपलेलच असायच. पण त्यांतल्या त्यात विठूला सूचा सहवास, तिच्या वाडिलाच आणि मित्राचं प्रेम, शेतावरच काम ह्या गोष्टीनीं समाधान दिल होत. त्या समाधानात विठूने वर्षावर अधिक दिवस काढले. त्यानतर एके दिवशीं सध्याकाळी जेवणखाण आटोपून विठू, सू आणि सूचे वडिल असे गप्पा मारीत बसले असता झोपडीच्या दारावर टक् टक् असा आवाज आला. सूने दार हळूच भीत भीत उघडताच तिचा चुलतभाऊ आणि त्याचा मित्र जरा दबतच आत आले. संथपणें आपली मातीची चिलीम ओढीत बसलेले सूचे वडील त्याना पहाताच जरा अस्थिर झाले. त्यानीं चिलीम हलकेच बाजूला ठेवून विचारल–

"का या वेळेस इकडे ? काही गडबड आहे गावात ?"

"गडबड नाहीं," सूच्या चुलतभावानें 'गडबड' या शब्दातला परिचित ध्वनि ओळखून उत्तर दिल.

"मग काय ? काहीं नवीन बातमी ?"

"हं. सू जरा दार बद कर," आवाज अगदी हलका करून तिच्या चुलतभावानं म्हटल, आणि आपली विडी शिलगावली. दोन चार झुरके घेऊन त्यानें ती तशीच पूर्ण न ओढताच वहाणेने विझवून टाकली.

सूने दार नीट बंद केलं आणि बाहेर बसलेल्या गड्याला येणाऱ्या जाणाऱ्याकडे लक्ष्य ठेवण्याची सूचना देऊन ती परत आपल्या जागेवर येऊन बसली. तिच्या चुलतभावानें सुरवात केली.

"आज दुपारीं गावांत धोक्याची सूचना आली आहे."

" धोक्याची सूचना ?" सूचे वडील उद्गारले आणि त्यानी आपली चिलीम पुन्हा शिलगावली.

" हो. दोन अधिकारी येऊन देऊन गेले."

" कुणाला ? नि कशाकरिता ? काय झाल ?"

" झाल नाही काही. पण व्हायच आहे—निदान व्हाव तरी...... सगळ्या गावाला सूचना आहे."

" पण भात तर दिला आहे गावाने. आणखी काय पाहिजे ?"

" सागतों. पण हे अगदी गुप्त ह. प्राण गेला तरी तोंडातून याबद्दल अवाक्षरही काढायच नाही."

सूने आणि तिच्या वडिलानी मानेने होकार दिला आणि ते ऐकू लागले.. विठूला त्याच सभाषण नीट समजत नसल्याने त्याचा प्रश्नच नव्हता. तो फक्त काहीतरी महत्वाच कारस्थान होत आहे हे समजून स्तब्ध बसला होता.

" जरा आणखी जवळ खुर्च्या ओढून बसू या. म्हणजे हळू बोलता येईल." सूच्या चुलतभावाने सुरवात केली. " आज दुपारी गावात दोन जपानी अधिकारी येऊन गेले. ता. १७ ला सैन्याची गाडी ××× हून ××× ला जाणार आहे. ती गावाच्या रेल्वे पुलावरून रात्रीं १२॥ वाजता जाईल. त्यावेळस पुलावर बंदोबस्त पाहिजे. अन् त्याची जबाबदारी गावावर, सबध गावावर. जर सैन्याच्या गाडीला पुलावर धोका पोहोंचला तर मॉगला कैद होईल अन् गाव बेचिराख होईल."

" पण कोण धोका पोहोंचवणार आहे पुलावर ? काही गुप्त कट केल्याची कुणी खोटी बातमी..."

" अजूनपर्यंत कट केला नाहीं. पण आता करायचा आहे. आता सामान जमलं आहे."

"पण कट कसा करणार ? आणि कोण करणार ?"

"कसा करायचा ते अजून ठरवायच आहे. आणि कोण करणार !..."

"कोण ? गाव ?"

"कोण करणार तेच–निदान कोण मदत करणार तेंच पहायला आम्ही आलो आहोत गावात आणि हा मॉग. आमच्याशिवाय कुणाला काही कल्पना नाहीं. गावाने दहा लोक निवडून त्याना पूल राखायच काम दिल आहे त्याना कटात ओढाव लागेल. पण ते नतर. आधी— "

"पूल उखडून टाकायचा अ ? समजलो. पण जोखीम आहे. अन् गावाला प्रायश्चित जबर मिळेल. काय फायदा ?"

"फायदा काही नाही. फक्त दोन चारशे गिधाड मरतील. अन् काही जखमी होतील. आघाडीवर सैन्य वेळेवर पोहोचणार नाही. पण त्याकरता हा कट नाहीं. मॉग्ची आई एका गिधाडाच्या गोळीने गेली. अन 'सू'ची गोष्ट......"

"काय करायच आणि कस करायच तेवढचं साग," सू तडफदार पण हलक्या आवाजात आपल्या चुलतभावाला म्हणाली. गवताच्या गजीजवळ आपल्यावर बेतलेल्या प्रसगाची तिला आठवण झाली. त्याचा सूड उगवण्याची सधि म्हणून तिने कटाला दुजोरा दिला.

"सागतो काय करायच ते. मॉंगने गेल्या वर्षभर भूमिगताच्या सहाय्याने दारु जमाविली आहे. सहा मोठे सुरुंग लावून पूल उखडायचा. दारु कुठून आणली हें विचारुं नका. सुरुग लागल्यावर मग सागेन."

"मग इथं येऊन काय सागायच होत ?"

"मॉंगवर जबाबदारी आहे. आणि तो सुरक्षित राहिला पाहिजे. सुरुंग पेटल्यावर तो इथं येऊन झोंपेल. घरीं सापडणार नाहीं."

"मॉंगला घरीच राहू दे," सू म्हणाली. सुरुग तुम्ही भरुन ठेवा. मी पेटवण्याच काम करत्ये. माझा सशय येणार नाही."

"तुझा सशय आला काय अन् नाही आला काय सारखाच. कुणाचाही सशय नाही आला तर सगळ्या गावावर सशय आहेच. अन् मग गावावर काय सकट गुदरतील याची कल्पनाही नको. गिधाडाची करणी माहीत नाहीं का आपल्याला!" सूचे वडिल म्हणाले.

त्या चौघाच गुप्त खलबत विठू ऐकत होता. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून त्यालाहि कुतूहल वाटू लागल, आणि त्याने कसल खलबत आहे म्हणून सूला विचारल. सूने दबलेल्या आवाजात आणि आपल्या मोडक्या तोडक्या हिंदुस्थानींत पापूला कारस्थानाचा आशय सागितला. त्यावर थोडा विचार करून त्याने सुचाविल की त्याला थोडी दारूची वगैरे माहिती आहे. तेव्हा सुरुंग उडवण्याचं काम त्यानी आपल्यावर सोपवाव. म्हणजे दोन गोष्टी साधतील. एक तर सर्व सशय त्याच्यावर आपोआपच केंद्रित होईल आणि दुसरे म्हणजे मॉंग् सुरक्षित राहील. कारण नाहीतर मॉंग्वर जपान्याचा डोळा असल्याने तो सुरुग लावून सूच्या झोपडीत आला तरी शेवटी त्याचा तपास लागणारच.

"—आणि एका हिंदी मनुष्याच अमानुष कृत्य म्हणून त्या सर्व गावातील ब्रह्मी लोकावर द्रोह केल्याचा आरोप यायचं आपोआप टळेल." विठू म्हणाला.

त्यावर थोडी भवति न भवति होऊन शेवटीं सुरुंग कोणी पेटवायचे तें चिठ्ठ्या टाकून ठरवाव असं सूचा चुलतभाऊ म्हणाला. कारण त्या धाड-सात प्राणालाही मुकण्याचा प्रसग येणार होता. त्याप्रमाणे चिठ्ठ्या टाकल्या आणि कर्मधर्मसंयोगाने सूनें विठूच्याच नावाची चिठ्ठी उचलली. विठूनेंही ती कामगिरी खुषीनें स्वीकारली. त्यानंतर सूच्या चुलतभावाने आणि मॉंग्ने

पुलावर देखरेखीकरिता नेमलेल्या दहा लोकाना फोडण्याच आणि वक्तशीरपणे सुरुग भरायचं काम आपल्याकडे घेतल. त्याशिवाय सुरुग पेटवल्यावर विठूने तेथे राहू नये असे ठरल. कारण, तो पळून गेलेला पाहिल म्हणजे 'गिधाडा'-चा त्याच्याबद्दलचा सशय ठाम होईल. त्याच्या पळून जाण्याची मॉग् आणि सूचा चुलतभाऊ यानी भूमिगताच्या सहाय्याने व्यवस्था करायची ठरविल. एकदा सुरुग पेटवून तो निघाला की कुठल्या रीतीनें त्याने पळायच याचा आराखडा त्यानी तयार केला. तो शेवटी ब्रह्मदेशाच्या बगालच्या उपसागरा-लगतच्या किनाऱ्यावरील एका लहानशा खेडेगावात पोहोचेपर्यंत विठूला मार्गदर्शन करणारा होता. पूर्वनिश्चित अशा त्या खेडेगावात पोहोच-ल्यावर पुढील व्यवस्था मॉगचा त्या खेड्यातील एक साथीदार करून देणार होता.

त्या रात्रीच्या गुप्त खलबतानतर 'सू'च्या वडिलाच्या भातांच्या खाच-रातील काम पूर्ववत् चालू होत. आणि मॉग व सूचा चुलतभाऊ फारसे पुन्हा सूच्या झोपडीकडे आले नाहीत. त्याचे निरोप मात्र एका म्हाताऱ्या बाईच्या मार्फत येत असत. पण सगळ्याच्या विचाराची गुफण ता. १७ भोवतीच होती. ता. १५ ला दोन जपानी शिपाई पुन्हा एकदां गावाची पहाणी करून गेले. जाता जाता ते सूच्या दाराशीही आले. दार बद असून आत सू, तिचे वडील आणि पापू एवढेच लोक होते. दारावर बुटाचे खाड् खाड् आवाज झाले. सूच्या वडिलानी दार उघडल. त्या दोन जपान्यानीं आत येऊन झोपडीभोवती नजर टाकली, आणि घरात कोण कोण असतात म्हणून विचारल. सूच्या वडिलानीं आपण, आपली मुलगी आणि एक हिंदी मजूर म्हणून विठूकडे बोट दाखवून सागितल. विठू मुद्दाम उठून उभा राहिला. जपान्यानीं त्याना खबरदार रहाण्याची धाकवजा सूचना दिली आणि ते बाहेर पडले.

ता० १६ ला सकाळपासून सूच्या मनोवृत्तींत खळबळ आणि चल-बिचलता आली होती, व तिच्या भावनाना उत्तेजित धार चढली होती. दुसऱ्या दिवसापासून पापूचे आणि त्या झोपडीचे संबंध तुटणार होते. त्या नंतर त्याची भेट पुन्हा सबध जन्मातही होण्याचा संभव नव्हता. अशा मनःस्थितीतच तिनें हाक मारली—

"पाऽपू ! पाऽपू ! पाऽपू !"

"सूऽऽ!"

"आवो !"

"आता !"

त्या दिवशीं संध्याकाळीं जेवण सपल्यावर सू, तिचे वडिल व विठू शेवटच्या निरोपाच्या गप्पा मारीत बराच वेळ बसले. वर्षावर अधिक दिवस जमलेले धागेदोरे उद्यापासून कायमचे तुटणार या जाणिवेने त्या गप्पाना जरा भावनार्तता आली होती. रात्रींचे अकरा वाजून गेल्यावर प्रत्येकजण झोपायला निघाला.

विठू आपल्या अथरुणावर अर्धवट झोपेतच होता. त्याच्या कानीं अस्पष्ट शब्द आले.

"पापूऽ..."

अर्धवट झोपेतच तो उद्गारला—

"कोन ? आवो...को...न्...आ...कावो...का...आव्...काव्"

सू हळूंच पापूच्या अथरुणात शिरली, आणि तिनें पापूला आपलं शरीर अर्पण केलं.



# — ९ —

“ सकाळी साडे आठ वाजले म्हणजे मासळी पिकते. पण बेडकाचे रात्रीचे बारा वाजले म्हणजे मग मासळीचे सकाळचे साडे आठ वाजतात. अशी मासळी लहरी असते. ”

किनाऱ्यावर बसून एक म्हातारा ब्रह्मी कोळी समुद्रात टाकलेल्या जाळ्याकडे पहात स्वगत भाषण करीत होता. त्याची मुद्रा फारशी साचित नव्हती. पण बाह्यतः तरी विचारपूर्ण होती. तो जरी आपल्या स्वतःशीच बोलत असलेला दिसत होता, तरी त्याच बोलण त्याच्याच शेजारी समुद्राच्या खाऱ्या पाण्याने ओलसर चिकट झालेल्या काळ्या खडकावर बसलेल्या एका व्यक्तीला उद्देशून चालल होतं. ह्या दुसऱ्या व्यक्तीच डोक अगदी तुळतुळीत असून तिच्या मिशा आणि दाढी झुपकेदार होती. थोड निरखून पाहिल असतं तर या दुसऱ्या व्यक्तीच्या चेहऱ्यात आणि सूच्या पापूच्या चेहऱ्यात अथवा विठू तुकाराम शिर्के, रहाणार भगतपूर, पलटण न. ×××× या शिपायाच्या चेहऱ्यात बरंच साम्य कुणालाही आढळलं असत. तो म्हातारा ब्रह्मी कोळी ब्रह्मी भाषेतच बोलत होता आणि त्याच्या बोलण्यांत अर्थ आहे किंवा नाही हेंही कळण्याइतकी ब्रह्मी भाषा अवगत नसल्यानें त्याच्या शेजाऱ्ची दाढीमिशावाली व्यक्ती फक्त हूं हूं करीत होती.

"...रोज समुद्रात जाळ टाकून बसतो मी असा—" त्या म्हाताऱ्या ब्रह्मी कोळ्याच स्वगत भाषण चालू होतं. "रोज...कधी सकाळी सूर्य उगवायच्या अगोदर, तर कधीं भर दुपारी उन्हात. पण रात्री जाळ टाकण्यात जास्त मजा वाटते. नेहमीच वार गार नसत. पण वर आकाशात मासळ्या चमकतात तेव्हा जाळ्यात सोन येत...तस म्हणजे या जवळच्या कोळ्याच्या खेड्याचा मी राजा आहे. अन् मला जाळ टाकून बसायचं खर म्हटल तर कारण नाही."

"हू."

"पण तरीही मी अजून एक दिवससुद्धा जाळ्याला विसरलो नाहीं." आपल्या हातातील काठीने पाण्यावर रेघोट्या काढीत तो म्हातारा ब्रह्मी कोळी म्हणत होता. "परवा मात्र एक हरिण येऊन बेडूक खाऊन गेल. रात्री झोप लागली तेव्हा ते बाहेर पडल हरिणाच्या पोटातून."

"हू."

"लोक म्हणतात ह्या भागात हरिणच नाही म्हणून. मग येणार कुठून इथे. त्यानीं चंद्राचा हिरवा रग पाहिला नव्हता. नाहीतर त्याना त्या रंगात बेडूक दिसल असत हळूच हरणाच्या पोटातून बाहेर येताना."

"हूं."

"बेडकाला हरिण फार आवडत. आणि हरणाला हिरवा चंद्र आवडतो. पण राजा कोळी होतो..."

"ह्यो पगा मासळी !" त्या कोळ्याच्या शेजारची दाढी मिशावाली व्यक्ति आश्चर्यानंदाने पाण्यातून चमकून जाणाऱ्या मासळीकडे बोट दाखवीत एकदम उद्गारली. पण त्या म्हाताऱ्या ब्रह्मी कोळ्याचं स्वगत भाषण चालूंच होतं.

"...चमकून पुष्कळ मासळ्या जातात. पण सगळ्याच जाळ्यात येत नाहींत. काहीं जाळ्याचे नुसते दोरच चाटीत बसतात, पण आत शिरत नाहींत. कांही लाबूनच जाळ पाहून पळतात. फक्त थोड्याशा आत शिरतात."

"हूं."

"मासळी पाण्यात कशी पोहते !—सूर्याकडे पाठ करून समोर आणि मग उत्तर ध्रुवाकडे."

"हूं."

"आणखी गाळ फार येतो जाळ्यात. म्हणून रोज उन्हात ठेवाव लागतं जाळ. एकदा पंचाइत पडली—कुठे ऊनच दिसेना. सगळा किनारा धरून हिंडलो पण उन्हाचा पत्ताच नाहीं. अस होतं काहींकाहीं वेळेला. मग थाबावं लागतं जाळ घेऊन. पुष्कळ तिष्ठत बसावं लागतं. नाइलाज होतो. अन् आश्विन शुद्ध द्वितीयेला रात्री ऊन पडायला लागतं. तेव्हा जाळ पसरायचं.".

"हूं."

"हू. चला आता." असं म्हणून त्या म्हाताऱ्या ब्रह्मी कोळ्याने आपल्या हातातली काठी पाण्यातून काढली, आणि समोर पसरलेल्या समुद्रावर दृष्टी रोखून पलीकडील क्षितिजापर्यंत नजर फेकली. आणि उठून तो चालू लागला. त्याच्या शेजारच्या दाढीमिशावाल्या व्यक्तींनेही त्याच्या पाठोपाठ चालावयास सुरवात केली.

* * *

ता. १६ च्या रात्रीनंतर ता. १७ च्या रात्रीं साडेबारा वाजता सू सहा सुरुंगांच्या सहा दणदणीत बारांनीं दचकून जागी झाली. त्या सहा बाराबरोबर रेल्वेचा पूल निखळला आणि त्यावरून जाणारी जपानी सैनिकानीं भरलेली आगगाडी कोसळली. मनुष्य, लोखंड, लांकूड, दगड यांच्या असंख्य

ठिकऱ्या अस्मानात उडून खाली पडल्या. त्याचा रात्र कापणारा आवाज दचकून उठलेल्या सूनें ऐकला आणि तिला समाधान वाटल. त्याच क्षणी तिला त्या आवाजामागे असलेल्या पापूची जाणीव झाली आणि तिच्या समाधानाचं रूपातर किंचित् खिन्नतेत झाल. तिनें अंगावर पाघरूण ओढल व स्वस्थपणे निजण्याचा दिखाऊ प्रयत्न केला.

सूच्या पापूनें सहा सुरुंग लावले आणि एकामागून एक होणाऱ्या त्याच्या बाराचे आवाज पाठीवर घेत विठू जो तेथून पळाला तो पुन्हा त्याने मागे वळून पाहिले नाही. सूच्या चुलतभावाचा मित्र मॉग ह्याने विठूला रस्त्याचा आराखडा तयार करून दिला होता. आणि कुठे कुठे थाबायचं आणि कुणाकुणाची भेट घ्यायची हेही सागितल होत. त्याचप्रमाणे विठूच्या मार्गावरील निरनिराळ्या खेडेगावातून वगैरे आपल्या साथीदाराच्या सहाय्याने गुप्तपणे विठूला समुद्रकिनारा गाठीपर्यंत मार्गदर्शन करण्याची व्यवस्थाही त्यानें केली होती. सुरुग उडवून विठू निघाला तो अधारातून मार्ग काढीत ज्या पहिल्या खेडेगावात थाबला तेथे त्याने दोन दिवस मुक्काम केला, व पूर्णपणे वेषातर करून तो एक मुका बुद्ध भिक्षु बनला. त्याने डोक वगैरे अगदीं तुळतुळीत केले आणि भगवीं वस्त्र परिधान केली. त्यानतर त्याचा कार्यक्रम म्हणजे दिवसा मॉगच्या साथीदारापैकीं एकाकडे दिवसभर गुप्तपणे रहायच आणि रात्र गर्द झाली की आडवळणी मार्ग कापीत पुढचा प्रवास करायचा. अशा रीतीने रात्रीच्या पायीं होणाऱ्या प्रवासातले अनेक विचित्र अनुभव घेत घेत विठू शेवटीं बगालच्या उपसागरालगतच्या ब्रह्मदेशाच्या किनाऱ्याला पोंहोचला. तेथें पोंहोचताच त्यानें दुसरें वेषातर केले, आणि तो एक दाढीमिशावाला ब्रह्मी मुसलमान बनला.

ह्याच ब्रह्मी मुसलमान किनाऱ्यावरुन समुद्राकडे पहात एका म्हाताऱ्या ब्रम्ही कोळ्याचं स्वगत भाषण ऐकत होता. त्याची दाढी आणि मिशा कुणी

जरा जोराने ओढल्या असत्या तर त्या त्याच्या हातात सुटून आल्या असत्या; आणि त्या आभरणाच्या अभावी विठूचा चेहेरा स्पष्टपणे उघडकीस आला असता. विठूने घेतलेल्या या सोंगाची कल्पना त्याच्या शेजारी बसून त्याला यत्किंचितूही न समजणाऱ्या शब्दाची त्याच्यावर सरबत्ती करणाऱ्या त्या म्हाताऱ्या ब्रम्ही कोळ्याची होती. असल्या युक्त्यात तो म्हातारा तरबेज होता. आणि त्याच स्वतःच सोंगही तितकंच बेमालूम होत. कारण, तो वास्तविक कोळीही नव्हता आणि म्हाताराही नव्हता. तो एक उत्तम ब्रम्ही दर्यावर्दी मनुष्य असून, जपानी आक्रमणापूर्वी किनाऱ्यालगतच्या समुद्रात छोट्या सफरी करणाऱ्या नाविकाचा तरुण पुढारी होता. विठूच लोण त्याच्यापर्यंत पोहोचण्याच्या अगोदरच त्याने विठूबद्दल काय व्यवस्था करायची याच धोरण आखून ठेवलं होत. आणि त्या धोरणानुसार विठूला ब्रम्हदेशातून परत हिंदुस्थानात यायला तो मदत करणार होता.

* * *

"हूं. चला आता," असं म्हणून तो म्हातारा ब्रम्ही कोळी उठला आणि विठूही त्याच्या पाठोपाठ निघाला. घरी गेल्यावर त्यानी जेवण वगैरे आटोपल आणि रात्रीचे अकरा वाजून गेल्यावर ते पुन्हा बाहेर पडले. एका गुप्त जागेवर ठेवलेल्या नावेतून किनाऱ्यालगत उत्तरेकडे सरकत जाण्याचा त्याचा पहिला उद्देश होता. त्याप्रमाणे त्यानी काही दिवस पुरेल अशी कोरडी अन्न सामुग्री आणि पाणी घेऊन होडीचा दोर सोडला व संथपणें वल्ही मारायला सुरवात केली. विठूचा किनाऱ्याला पोहोचण्यापूर्वीचा खुष्कीचा प्रवास जसा मुख्यतः रात्रीचा होत असे तसाच त्याचा आताचा जलप्रवासही मुख्यतः रात्रींच होऊ लागला. दिवसा होडी किनाऱ्याजवळ कुणाच्याही नजरेला सहसा येणार नाहीं अशा तऱ्हेनें तो म्हातारा ब्रह्मी कोळी बांधून ठेवायचा; व दोघेहि किनाऱ्यावर जाऊन, लागेल त्या गावचे रहिवासी म्हणून, दिवस

काढायचे. रात्रीं पुन्हा होडी सोडून सथपणे वल्ही मारीत पुढील मार्ग ते आक्रमायचे.

याप्रमाणे तीन दिवस गेल्यानतर चौथ्या रात्री त्याची होडी पाण्यांतून सथपणे मार्ग काढीत असता तिच्यातील म्हाताऱ्या कोळ्याने एकदम वल्हीं एके ठिकाणीं थाबविली. आकाशात चद्र नसल्याने चादण्याचं तेज ओसडत होतं. त्याच्या प्रकाशात, व होडी चालत असताना वल्ह्यानी पाण्यात उमट-विलेल्या दोहो बाजूच्या मुद्रा बघण्यात विठू मग्न होता तो किंचित् दचकला. त्यानतर हळूच दुसरी एक होडी किनाऱ्याकडून विठूच्या उलट दिशेने येत असताना त्याला अधुक दिसू लागली. ती जवळ आल्यावर तिच्यातील एक मनुष्य विठूच्या होडीतील म्हाताऱ्या ब्रम्ही कोळ्याशी काही तरी पुटपुटला. विठूला त्याचा अर्थही समजत नव्हता. पण नतर त्या म्हाताऱ्या कोळ्याने आपल्या होडीची दिशा उत्तरेकडून पश्चिमेकडे वळविली. ह्याप्रमाणे एक दोन मैल होडी गेल्यावर त्या म्हाताऱ्या ब्रम्ही कोळ्याला एकदम हिंदुस्थानी वाचा फुटली. त्यानें विठूला सागितल की आता किनाऱ्याच्या आसऱ्याने उत्तरेकडे जाण्याची आशा सोडली पाहिजे, कारण तस जाण धोक्याच होऊन बसल आहे. आता विठूला आपल्या नशिबावर हवाला ठेवून समुद्रावर तरगल पाहिजे.

त्याप्रमाणे विठूने जवळ ठेवलेला लाइफ बेल्ट् घेतला आणि आपल्या-बरोबर येऊन आपल्याला इतकी मदत करणाऱ्या त्या म्हाताऱ्या ब्रम्ही कोळ्याचे हिंदुस्थानींत आभार मानले. एक पिण्याच्या पाण्याची बाटली आणि थोडं कोरड बिस्किटासारखं खाद्य बरोबर घेऊन, परमेश्वराच नाव घेत होडीच्या काठावरून त्याने समुद्रात उडी मारली. समुद्रात लाइफबेल्टच्या सहाय्याने तरंगायला लागलेल्या विठूला बंगालच्या उपसागरावर पहारा कर-णार कुठल तरी दोस्ताचं जहाज लवकरच खास उचलून घेईल असा आशावाद

दाखवून तो म्हातारा ब्रम्ही कोळी ब्रम्हदेशाच्या किनाऱ्याच्या दिशेने परतला.

विठूने समुद्रात उडी मारल्याबरोबर थडगार पाण्याच्या स्पर्शाने त्याची कातडी थरारली. त्याबरोबरच चादण्याच्या प्रशात प्रकाशात मधुरपणे मंदावलेली त्याची संज्ञाशक्तीही त्या त्वचा-सवेदनानी विस्मयकारकपणे उत्तेजित झाली. सभोंवतालच्या वर खाली मुरडणाऱ्या, लोळणाऱ्या लाटावर त्याची नजर फिरू लागली आणि त्याचे विनाप्रयास तरगणारे शरीर हेलकावे घेत यदृच्छया रागू लागले.

भगतपूरच्या शेजारून झुळझुळत जाणाऱ्या कृष्णामाईच्या थडगार पाण्यात पाच वर्षाच्या लहानग्या विठूने म्हाताऱ्या सदोबाचा हात धरून पहिली बुडी मारली.

आज त्यानतर वीस बावीस वर्षांनी, विठू तुकाराम शिर्के, रहाणार भगतपूर पलटण न. ×××× या शिपाई गड्याने एका 'म्हाताऱ्या' ब्रम्ही कोळ्याचा हात सोडून अपरपार पसरलेल्या अगाध लाटाच्या ठसकेदार धुंद घोंघावात हादरणाऱ्या सागरात पहिली बुडी मारली.

नि ही शेवटचीच तर ठरणार नाहींना असा अस्पष्ट विचार त्याच्या कातडीला चाटून गेला.

आणखीही असेच कितीतरी विचार विठूला चाटून गेले. विचाराखेरीज खाऱ्या पाण्यातले मासेही त्याच्या कातडीला चाटून गेले. त्या दोहोंच्या चाटण्यातला फरक त्याला कितीसा सागता आला असता कुणास ठाऊक! करमणुकीकरिता विठू मधून मधून पाण्यात हात मारी आणि त्यावर चित्रविचित्र आकृत्या उमटवी. त्या आकृत्या दिसतांक्षणींच त्या अगाध जलार्णवात अदृश्य होत. पण क्षणभर कां होईना विठूला त्याचं स्वरूप दिसत असे. पण हादरणाऱ्या लाटाच्या गभीर आवाजाच्या तालावर त्याचं पाण्यांत लोंबणार

गारं शरीर इतस्ततः हलकावत ज्या अनंत वलयाकृत्या चितारीत होतं त्याच आकलन किंवा दर्शन इतर कुणाला होत असेल ते असो; पण धड शेंडा ना बुंधा, वर आकाशात धरायला तुळई नाहीं नि खाली पायाखालीं धरणी नाही, अशा त्रिशंकुगत स्थितीत तरणाऱ्या विठूला ते खास होत नव्हतं! इतकच नव्हे तर त्याच्या अडाणी मनाला आपलं शरीर काही वलयाकृत्या चितारीत आहे ह्याची जाणीव सुद्धा असेल की नाहीं शंकाच आहे!

ओलं झालेलं बिस्किट तोंडात टाकीत विठूने पूर्वेला समुद्रातून उगवलेला सूर्य पश्चिमेला समुद्रात बुडताना पाहिला. आणि तो मनाशींच म्हणाला 'योक दिस् गला!...योक...दिस्...यो...क्...यो...यो...ऽऽऽ रं माज्या मागल्या... अन् फूं ऽ फू ऽ...गज्या मागल्या नव पुढल्या...पुढल्या...इठू यनार पुढला गडी...यनार सद्बा...सद्बा ह्यो पानी पोचतया इठोबाच्या शिखराला ...आजची शर्यंत उद्याची टाळी...टाळी थाप...पहिली सोल तान्हीची मालुसरे....दुसरी सोल सूची...अरं सूरपानी पूरपानी पाकूनशान पोंचलाय इटू अन् ह्यो गभतपूरच्या गोद्याची जिरलीया...वारे इठू परत तसाच...कृष्णेच पानी धरनावाणी...गुलाफशेटची हिरवी गार...गार...गारगोटी नि शख... शंखभाद्या अर धरणावर पोहायचं म्हंजे काय गुडघाभर पान्यात सू...र... मारायचा व्हय...भिंतीवरनं देवळाची होडी कर न् उडी टाकलीय...आवदाची कृष्णेची शर्यत इठूनं शिंकलीया म्हातारबा सद्कोळी इठूला बक्षिस.. वारे पोहणारा...डबल् मार्च...अन् तान्ही माज पाय रबरावानी...पायरब ....पायरी घाटाची...तरगतुया...तुयायातुवो...तुक्या...बाबा ह्यो हात धरायाया...या की...वो दादा...अर धर...नाच्या पान्यात कुनी सू...र... मारतुया व्हय...व्हय पर मरल की लेकाचा...काचाविना लंगोटी शर्यत... ह्यो तीरें गाठला अन् परत इठोबाच्या पारावर...अन् तूं कोन पारावरली रानी हंसूनशान् गानी...तान्ही...थान्ही...थाना...नी...की जय म्हाराज...

जंपम् अर्ज येसूचा...वो येस् आकूगाडीचा पूल हाय् अन् माजी नोकरी तू...खाचरात खोचरी शिर...शिरगुडघाभर पानी...धरणाच.. जोधळा पिकाया खोचर भरावी लागत्याची येस्...मऊ मऊ खाचर अन् मऊ मऊ सू...सू . येबलस् पचकल्यानी रानी...रानीस्...भर खाचर...भाते पिकुनी पिवळी झालीं.. देवाजीने करुणा केली...खाते विकुनी झबली ब्याली... ...कोन ब्याली...कोळी दादा राम राम...पाच गावचा एकदाम ..बापर खाचरात...खार पान्याची खोर झाली...अन् समुद्रावर धरण बाधत्याती व्हय...लेका मार सूऽऽर मार सू...ये...सू काड्याची पेटी मोड...पर कारखान्याची नोकरी सोड...धर भाताची खाचर...धर म्हजे थान्हीचा जोधळा पिकल कृष्णेजवळ...जवळ...जवळ कोन हाय...बघ ना गोधडी खाली...स...सग बार उडयलान्...तिसरी सोल पस्तनजी दादाभाईची...ईची भन् ह्य पानी थड लागतया बाबा...थड थड...अगड भमभम वाजे डमरू नाचे इटू सिंव भगत्भोरू...तान्हीची काव् येसून खाल्ली अन् चोच मारली सूला...पर चोंच मारली कावळ्यानं म्हजे चीच लइ ग्वाड लागते... इव्या चिच खातुया....नइ मास्तर यक व्हता गवडी अन् त्येचं व्हत जाळ ...वगडी फाळंऔताच... टाळ...जाळं समुद्रात टाकल म्हाताऱ्या वगं-ज्यान...हांडीबर्बर...गड्डखास्त...खड्ड मास्तर इकड बरम देशात कवा काव्...काव्...गाव .अरे हयो गाव इजेच म्हूनशान् इकडं आलो येसुला घेऊन पर चार पजे हात–चे–केल सत्तावीस .चार पजे सत्तावीस...

...हंऽ आहे की नाय ह्य इजेचं गाव...इजेच अस्तर डाबरी रस्तर मास्तर...अन् दिव्याचा लखलखाट...अरे हयो भगतईची पूर शाळा... सवच्छ अन् इजेचा पंखा...पर डत् मास्तर आवदा रातची शाळा...हंऽ... रातची...पर इज आहे ना इज...आर...अरच्चा इजार पान्यान भरलं की बिजलीभी...बगाल करून...अन् हयो शीवचा पोस्टमन तार हपीस...पीस

पत्ता...इज इज इज...अन् मास्तर सिनेमावी हाय...शाळाच नाटक बी हाय...पर मास्तर खब्ज्यावर बाजी परभू मेला तवा समिंदर खारा झाला... कोईलीबार—लगनभाकतीमदिरल...अरे हयो इस्पिताळ...इजापिताळ... पिताळ पातळ अन् ताब लब...इठ्या तू वाइच इस्पितळात बोर खात बस ...आमी बडल चार्मा....र्च...डबल मार्च....लाइट रेफ्ट...फाईट फेट... इजेचा लाइट...पलटन न.....राइफ लेफ्ट....राइस लेट्फ् ...आमी आता शिपाईदादा व्हणार...नार...नार...कुन्या गावची इठ्या जपान... पानी पानी....भुस्कुट भुस्कुट...कुट् कुट्....स्कुट...स्कु...स...उ ..सू. . कु....ऽऽ.. .आव्....आव्....काव् पीपीलाटी...

...इटी दाडू पीटी . वडीवर घडी कुणाची कुरेघडी मामलतदारची विडी शकरभटची पुडी आगिनगिडी. .

वो माय, माय व...कोन इठू हा माळुकी हयो इठू आगिन काडीमोड...ली...पर म्हातुर लावून आलाय इजेच्या गावी.. धरणाच पाणी बाधल काळ त्या गरमतुया अस्मानी फाळ नागराच फाळ अन् खाचर भरल...ये...की येसू...हयो तुझ घर हाय...हयो इजेच दिव तू खपे .. बटन फटन् दाबल की धुतंय...कपड अन्...दटन बाबलय...की भाडी घासतय....ह्यो इजेरच्या गावचरची मज्जा...अन् इठूच्या बायकोला राधाया सूल सूल...चूल नी सुल. .सूला भूल...यकोला चिंच.. ची . चू . ल...त्येबी इजेज्या कोळशाची.. इठ्या अर डुबतोया क्रिष्णेत अन् इज कोन राधल...त्येचा भोंतला कोन राधल...धल....राध...आधल....

. . कोळी दादा कोळी दादा तुमची काढा दाढा की...नाय तर सू ..र...या...चड...च. अऽऽ पढल दाढीवर...अर....इठ्या मी म्हातार झालुय....म्हूनशान गला कोळी म्हणतुया व्हय अरं ...ह्यो तुझा आजूबा

लद्का कोळी झालाय पर जाळं नाई ...ह्ये टटन् इजेच हाय.. टेकलं तेन बेब्र जाळं काळ...पाणी

...उद्याला समिदर भरल...ईजबी फुगल...अन् सूर्बी फुगल... अन् येसूबी फुगल... अन् मी बी फुगल...फुगल बी फूगल...बी फुगल.. बुगल...बुगल...बुगल...वाजतुया परेट हाय...पर पोट फुगल अन् बोट लागल...हा अर मी इठू हाय...अर पान्यात हाय मी इठू...तुकाराम शिर्के ...पलटन न. *-*...पलटोन पाटलोन व्हय फाटली की लेका...हा दोस्त हाय...पर दोर टाक कीं...पहिली सोल साळुंकीची भिऊ नको माझ्या बेटा....यक व्हता गवडी...भीत नाइ माय...पर सोल तुटतीय...दोन पुरुष वरती गेल...मी तिसरा अडकलो...भडकलो...अन् योक पाढरा दाढीवाला मुसलमान दोस्त आला...पर तोंड दिसत नाहीत त्येच पान्यात...करतुया काव् काव्...आवह म्हून सोल तुटली...बिगी बिगी फुटली सहा रुसुग... गुरुग...गुरुग...हाय रकमाई...पर ह्यो धरनात शंक नाय हाय गोद्या... हिरवी मासळी मोनी हाय...पर कच्ची...बच्ची...ची...ची...

'रात व्हया लागली'....'कावळं घरा आलं'....दाणा पाणी प्यालं....भुर्रदिशी उडून गेलं....इमानात बसून शान् इजेच्या गावी आलं....योक व्हता म्हातार गवंडी त्येन बाधल पलटणीचं घर....त्यत बसला लागमन सायब....बंदुक घोडा लागमन बोडा....हडेलहप् हपेलडप् डप् डप् ....अरे ह्यो इठू तुका आलाया....अरं बटन.... दाबा इजेचं.... ह्यो हालात टबन् बी नाय का हाय....अरं इजेचं टबन् पान्याचं नाय.... इठू जिवाजी म्हाराजला पच केलं कीं ऑजांर्ज की जय, अन् ह्यो तुजा बिल्ला तानाजी परभूनं सर केलाय....सूर मारून....अन् काय चमकुतया इजेत.... इजेत...इ...जेत...

....जेत....जत....कुनाच शेत....भाताचं हाय....अन् साळुंकीन भाताची भाकरी राधलीय येसून माधलीय पुरन पोली...कुणाची होळी.. अर रामजी . शेट...ची आपल्या भावडून गोधळी...भावडूला पाच पोर झाल्याती अन् तान्हीला एक...तान्हीला . नान्हीला पानी...इजेच हा हयो इज्येच गाव....हाय ना...समदी गाव...इजेची हायती...अन् हयो बागत फूल हाय ना त्यो बी इजेच लख्ख्...नू . सू...ये....यचा म्हून ईज घेतली मवईसारखी...शेतावर बी ईज हाय तुज्या...इज्या बिजा....पर...बिजपर.. वर...पर तिज्या कोन्...फुज्या....फोज्या...फा...ज्या...ज्या....ज्या...

मणभर पाणी खडीभर वानी...मनभर वानी न् मंडीभर पानी...माडी-भर नाय पुरुषभर...घरनात माडीभर पानी असतय व्हय...कुनाची माडी.. सूची...मनभर पानी थाना...थंडीभर वानी...थनभर...थनभर सूयेन्ही.... कुनाचा थानभर खडी...वान्यावर फिरली व्हडी...पान्यावर घर वावडी. दाना भरल मनाच्या पुडीं....खडीभर पानी अन् मणभर वानी...मनभर वानी वानरकानी...लागमन सायबा...बा...वा...नरकरणी कर तो नर का इठ्ठयन बन जाय...नारायन इठू...इठू तुकाराम...तुकाराम सद्बा.. सद्बा...पहिली सोल सद्बाची...दुसरी सोल साळुंकी रामाची...तिसरी सोल ...तिसरी मोल...तिसरी सोल...लाइफ पट्टा कोळी दादा सोल...हरिणानं चड्डक खाल्ल अन् चादोबान हरिण खाल्ल....खाल्ल...काल्ल...आज भूस् भूस्...भुस्कुट....राइट लेफ्ट...लेफ्ट...लेफ्ट...लेफ्...लेफ्...सु...रनारायन इठू...ले...का...सूचा लेका सूरचारायन इठू...चा लेका लेफ्टा.... लेफ...ले....

...समद्या गावामंदी या इज्येनं बहार केलीया...इजेच गाव खारचा वानी सवच्च अन परकाश...अन समद्यास्नी शाल...बाजी परभूची गोष्ट.. शिरका अन् डोकं तुटलं तरी इस्पिताळ...अन् शेतातर बीज अन् घरात

बीज...अर ह्योतर म्होतर बाबा अक्षी नंदनवन हाय की पर. परकी... पर...की...परीकी...परी माजी घरी..परी बी हाय...ये...परी...की... सू....येसू....अन पख्याच बटन दाब....अन दिवाच बटन दाब....दाब.... अन् ये....सू....ये....झोप आलीया....ये....सू....बी हाय....येऽऽ.... सूऽऽ....ऽऽ....

कोन् तुम्ही म्हातार पाढर दाढीवाल....काव काव....पर मी कावळा नाय....पान्यावर बी चालत यतया तुमी दाढीवाल....पर तुमच जाळं कुठय ....कोन दादा....पन् पाढी दाढरी हाय तुमची....खरी नाय तर काय सोंग घेता व्हय....सोंगाडी....सोडगाडी....ओडगाडी....काय गाडी बी नाय अन् बैल बी नाय....मंग तुमी कस आल्याती....पर दादा धरनाच्या या पान्यातनं तुमी मला कसं काढणार....बाबाचा....तुमचा डावा हात.... हात....हात....हात धरू व्हय तुमचा काय दादा....डावा नाय पर उजवा हाय त्योच धरू....?....पर वर यता यता सोल तुटल....हयो लाइफ बेल्ट हाय ना ह्योला धरून शान् लटकतुया....पर वर याया....ह्यो धरला पा तुमचा हात....धरला....धरला....बापरे....ह्या समिदराच पानी खाली ओढतया....पर हात हात....हात....चा....काव....काव....वारे पाढऱ्या दाढीवाल्या....दादा हाय सागून भूल केली व्हय. वारं....कार....तुज जाळं....हाय कुठ डाळं....वाऽऽर....अन् डावं हात कुठ हाय....कु... कु....कु....

...र्र र्र र्र....फुर्रर्र....फुर्रर्र....बाबा....बाबा....बाबा....सद्‌बाबा... मी रडत नाय आता...रडत...तडत...डरत...सहा वर्साचा हाय...अन् कृष्णेत बुडी मारलीया....पर कानात नाकात पानी....पानात कानी....अन् लंगोटात....पानी....ह्यो पहिली बुडी हाय....ह्यो पानी खोल हाय.... हात धरा....ना....वाइच जरा...दादाला पानीवर चालूनशान् गेला...अन

माय रागावल...उशीर झाला म्हणजे इख्या चल पान्यातून नीघ. भो फोक.. फों...फो

बाबा वो सद्बाबा सद् बाबा.. हेया वाइच...लाइच...फो फाइच...फाइफ वाइफ...लाइफ टेल्ट हाय हयो खाली ओढून शान धरतोय लंगोट...अन हात दमलया...या...या. .या ऽऽ...''

अथांग, असमर्यादित सागराच्या दमदार लाटा ठमकदार घोवावात लोळत होत्या.

त्या लाटावर एक जिवंत पण संज्ञाशून्य शरीर लाइफ बेल्टच्या आधारावर तरंगत होतं, आणि आपल्या आमटीच्या वाटीएवढ्या हृदयातून टक् टक्ची साथ त्या अफाट जलविस्ताराच्या अखंड, अप्रतिहत, गर्जना-कल्लोळाला देत होतं :

घोंऽघोऽघोऽघोऽ

टक् टक् टक् टक्

घोऽघोंऽ टक् घोऽघोऽ

ऽ टक् ऽ

ऽ घोऽऽघोऽऽघोऽऽऽ

# १०

"...अन् मग लढाई झाली केरेनची । तेथें नव्हती भाला बरची । तरीं मराठा गडी नाहीं डगमगला । सामना दिला जिवावर होऊन, लावली सरबत्ती तोफांची । अन् बोलला शिवाजी महाराज कीं जय । जिरवली रग इटालियनाची ॥ जी जी ॥ त्याप्रमाण ब्रह्मदेशांत जपानी शिरला । तेव्हां मराठा गडी तिथंही गेला । रायगडची भवानी आठवला । गर्जला हर हर महादेव अन् चारली रणधूळ जपान्याला ॥ जी ॥ जी ॥..."

तीस वर्षांपूर्वी भगतपूरात कृष्णामाईच्या काठावर तानाजी मालुस-ऱ्याचा पोवाडा आपल्या खड्या आवाजात म्हणणारा आधळा गोविंदशाहीर आज साठ वर्षांचा होऊन अनामिक मराठ्याचा स्वतः रचलेला पोवाडा म्हणत होता. त्याचा आवाज कापरा झाला होता, पण त्यातही विस्मयकारक कणखरपणा होता.

वर निळ्या आकाशांतून काळ्या अंधाराचा शह बसत होता, त्यावर 'विजेच्या गावा'तलीं प्रकाशाचीं प्यादीं मात करण्याचा प्रयत्न करीत होतीं. त्याच्या अविरत प्रकाशाच्या झगझगाटात साठ वर्षांच्या आधळ्या गोविंदशाहीराला दगड आणि सीमेंटच्या इमारतींची पार्श्वभूमी लाभत होती.

आणि त्याच्या सभोवती भगतपूर आणि भगतपूरसारख्या इतर गावातील मराठमोळा कर्तृत्वाच्या चाकोऱ्यात फिरत फिरत येऊन बसलेला होता. साठ वर्षांच्या आंधळ्या गोविंदशाहीराच्या प्रत्यक्ष खड्या बोलावर अजूनही तो थरारत होता ! भूतकाळच्या रणधुमाळीचे पडसाद उठवून ज्या शाहीराच्या वाणीनें सह्याद्रीच्या दरीदर्‍यांच्या पहाडी लपडावात वीरश्रीचा माग पूर्वी काढला, त्याच शाहीराचा खडा बोल आज वर्तमानकालातील मराठ्यांच्या शौर्यापासून स्फूर्ति घेऊन विजलीने पोखरलेल्या अंधारात सह्याद्रीच्या शिखराना अभिमानाचा नि आशेचा नवा परवल देत होता !

‘ विजेच्या गावा’भोवती मातीविटांच्या खोपटात वस्तीला आलेला, हजारानी मोजता येईल एवढा मराठमोळा थक्क होऊन त्या आंधळ्या आणि म्हाताऱ्या शाहीराचा परवल आपल्या अंतःकरणात झेलीत होता !

तोच परवल सह्याद्रीच्या एका कुशीतील झाडाझुडुपाना आणि दगडमातीला कुरवाळीत, अनेक नष्ट आणि अवशिष्ट संज्ञाशक्तींचा कानोसा घेत घेत, अनंत ज्ञात आणि अज्ञात सुखदुःखावर प्रेमाची गस्त घालीत घालीत; मेलेल्या वा न मेलेल्या जन्मलेल्या वा न जन्मलेल्या अशा अलोट क्षुद्रजीवांच्या सकलित क्षणभंगुरतेवर उदात्ततेचं पांघरूण ओढीत ओढीत, मराठमोळ्याच्या विजलेल्य जीवनाची लक्तरं चैतन्याच्या कणखर सुईदोऱ्याने शिवत शिवत, विज्ञानाच्या भव्य आशावादी यंत्रावर दणकट मानसिक सामर्थ्यांचे पट्टे चढवून सह्याद्रीच्या ललाटावर भाग्याचे आशीर्वादचुंबन उमटवीत उमटवीत; अखंड दिक्कालाचा अमर्याद पडदा एका इवल्याशा, जवळ जवळ कस्पटासमान अशा जीवन परमाणूवर दयेने सारीत सारीत; संथपणे, संथपणे, संथपणे येत येत मंद गतीनें पाऊल उचलणाऱ्या विठूच्या संज्ञाशक्तीची किनार स्पर्शून गेला.

साठ वर्षांच्या आंधळ्या गोविंदशाहीराच्या परवलातील स्वर आणि व्यंजनें विठूच्या मनात शिवाशिवीची गमत खेळूं लागले. पण त्याना पकडता

पकडताच विठूचं मन त्याच्यावरून उडालं आणि काळाचा पायबंद तोडून, ज्या आगगाडीने तो कलकत्त्याहून मुंबईस व मुंबईहून पुण्यास आला होता त्या आगगाडीच्या डब्यातून फिरू लागल. क्षणार्धात तें एका थर्ड क्लासच्या डब्यातल्या सडासात शिरल आणि त्या सडासाच्या लाकडी भिंतीवर काळ्या पेन्सिलीने चिताडलेल्या काहीं स्वर-व्यंजनाभोवती घुटमळू लागल. इ, न्, क्, इ, ल्, आ ब्, झ्, इ, न्, द्, आ, ब्, आ, द्....मोजा स्वर नि व्यंजने ! अबब ! त्यापेक्षा सोपं गणित आहे हे : च्, अ, ल्, अे, ज्, आ, व ! थर्ड क्लासच्या त्या घाणेरड्या सडासात कुणि चिताडलीं असतील हीं अक्षर कुणास ठाऊक ! त्या अक्षरावरून विठूच मन आणखी थोडं मागे उडालं. मागें उडता उडता ते हुगळी नदीच्या देखाव्यावर थाबलं.

हुगळी नदी ! जिवंत बेशुद्धावस्थेतून हळू हळू शुद्धीवर येत असताना विठूला पहिल दृश्य दिसल ते हुगळी नदीच्या सथपणे मागें सरकणाऱ्या दोन्हीं तीराचं आणि घाणेरड्या, जवळ जवळ निश्चल अशा, तिच्या प्रवाहाचं.

म्हाताऱ्या ब्रह्मी कोळी मित्राच्या होडीतून विठूने समुद्रात उडी टाकली त्यानंतर प्रथम शुद्धीवर व नतर बेशुद्ध अशा अवस्थेत विठू समुद्राच्या पृष्ठभागावर लाइफ–बेल्टच्या आधारावर तरगत होता. त्याच्या जिवत पण सज्ञाशून्य शरीराचं स्वतःच्या संवेदनाच सुकाणू सुटल होतं. त्या साडेतीन हात देहाला स्वतःच्या इच्छाशक्तीचं होकायत्रही नव्हत. हाडामांसाच्या त्या जवळ जवळ दोन मण वजनाच्या जड गोळ्याला आपली स्वतःची अशी स्वतंत्र गति नव्हती. विठू तरगत होता तेथून अदृश्य अशा विस्तीर्ण भू-प्रदेशाच्या किनाऱ्यांनीं कुठित केलेल्या आपल्या अनंत परस्परछेदक प्रवाहाच्याच प्रचंड प्रेरणेने उसळणारा अफाट समुद्र; आपल्या अथाग संचयाच्याच स्फूर्तीतून लाटांच्या रूपात हादरणारं असं प्रलयार्त पाणी; खोल तळाशीं असलेली पृथ्वी आणि वर आकाशात असलेला चंद्र याच्या परस्परविरोधी आकर्षणांच्या छेदबिंदूवर न भांबावतां तुंबळणारे पर्वतप्राय लवचिक जलाकार !

ह्या अमानुष प्रपंचात ना कुठला स्वर, ना कुठलं व्यंजन ! सारी भाषा अप्रहित, अनामिक सुराची ! वाऱ्यावरचा आघात आवाजाची संदिग्धता तोडून स्वर व्यंजनाचा आकार धरायला लागणार तोंच ती सारी गर्जना अतर्क्य शून्यात मिसळून जायची; अन्वय जुळालाच तर दोन्हीकडून गालफडात चपराक मारणाऱ्या दोन मत्त लाटाचा ! आणि अर्थाचा ध्वनि पारखला गलाच तर तो नागमोडी फेसाच्या हेतुशून्य, पाढऱ्या कवळ्याच्या वळणातला !

येथ कुणाच शरीर ! कुणाच मन ! कुणाची गति ! नि कुणाच्या भ्रमणाकृति !

पण ही पचाईत करण्याची जरूरी अथवा इच्छा बगालच्या उपसागरा-वर गस्त घालणाऱ्या हिंदी नौकादलाच्या छोट्या लष्करी जहाजाला नव्हती. त्याने लाइफ बेल्टूवर लोंबकळणार ते शरीर पाहिल आणि शिस्तीच्या रिवाजाने त्याला वर घेतल. धमन्यातल्या धुगधुगीला फुकर मिळाला. एक जिवत प्रेत नावारूपाला आल. विश्वाच्या विराट् स्वरूपात फक्त ओली-कोरडी लाबी, रुंदी आणि वजन यानी ओळखली जाणारी, गुरुत्वाकर्षणाच्या तालावर डुगडुणारी वस्तु माणसाच्या चिचोळ्या जगात सोईसाठी पुन्हा ‘ विठू ’ बनली, बनवली गेली !

हुगळीच्या पात्रांतून ऐटीने पाणी कापीत जाणाऱ्या त्या जहाजाच्या डेकवर विठू आरामखुर्चीवर बसला होता. त्याच्या मनात आपण कसे वाचलो त्याबद्दल आश्चर्य नव्हतं. त्याला वाटत होतं आश्चर्य ते अगावरच्या कोरड्या कपड्याच. त्या स्वच्छ, कोरड्या कपड्यांकडे तो किति कुतूहलाने, कौतुकाने पहात होता. जहाजावरून विठू कलकत्त्यात उतरला आणि कलकत्त्यांतच थोडे दिवस राहिला. प्रकृति जरा बरी झाली आणि विठू तुकाराम शिर्के रहाणार भगतपूर, पलटण न × × × आपल्या नावानिशी सैन्याच्या

अधिकाऱ्यामार्फत पैसा नि कपडा घेऊन मुंबईच्या गाडीत बसला. वास्तविक कल्याणला उतरून पुण्याची गाडी गाठायची हा त्याचा पहिला विचार. पण नाशिक सुटल आणि मुंबईला बघण्याची ओढ विठूला जाणवली. फारसा विचार न करिता तो शेवटीं मुंबईला पोहोचला. त्या गजबजलेल्या शहरात ओळख पटणाऱ्या अनोळखी जनसमर्दात, वातावरणात विठूने काही तास घालविले आणि तो अखेर पुण्याला आला.

थर्डक्लासच्या घाणेरड्या सडासातून विठूच मन उडाल ते हुगळी नदीच्या देखाव्यावर थाबल. तेथे त्याने आपल पख थोडेसे फडफडले. त्या क्षणालाच खिशातली सिगारेटची पेटी काढून विठूने एक सिगरेट पेटवली व तिचे झुरके घेत तो 'विजेच्या गावा'चा रस्ता हळूहळू आक्रमू लागला डेकबरल्या कोरड्या कपड्यांची आठवण झाली तसे त्याने बुटाच्या ठोकरीने रस्त्यावरला एक छोटा दगड लाब भिरकाविला ! समोर 'विजेच्या गावा' चा लखलखाट रात्रीला अधिकाधिक उजाळा देऊ लागला, पावला-गणिक साठ वर्षांच्या आधळ्या गोविंदशाहीराचा खडा परवल जवळ जवळ येत होता. का कुणास ठाऊक पण दुःखाने दुःखित होण्याची नि सुखाने आनंदित होण्याची विठूच्या मनाची शक्ति थोडीशी नितळ झाली होती. तिला एकप्रकारचा क्षुद्रपणा आला होता. ह्या क्षुद्रपणाचे स्पष्ट स्वरूप जरी विठूला समजत नसले तरी त्याची जाणीव मात्र, निर्विकार होती. विठू विजेच्या गावाच्या कडेला येऊन पाहोचेपर्यंत पोवाड्याशी तल्लीन झालेला मराठा समुदाय पांगायला लागला होता. त्यातील एका अनोळखी गड्याला विठूने विचारल:—

" सदूबा शिर्के कुठ असत्याती हाय ठाऊक ? "

" सदूबा शिर्के ? " त्या अनोळखी गड्याने आश्चर्य व्यक्त केले. " नायबा नाव बी नाय ऐकल त्यंच पर त्या रामजा हाय त्येला असन

माहित. " असं म्हणून त्याने राम्याला हाक मारून 'सद्बा शिर्के' कुणी इथं रहातो का असं विस्मय आणि अविश्वासाच्या आवाजांत विचारलं. राम्यानेहि सद्बा शिरकेच नाव ऐकलं नव्हतं आणि तो तिसऱ्या एका मित्राला विचारणार इतक्यात विठूची स्वतःची नजर एका म्हाताऱ्या व्यक्तीवर गेली. क्षीण शरीर मळक्या कुडत्याने नि धोतराने कसबस झाकलेलं, तोंडावर करुणाजनक सुरकुत्या; डोक्यावर फाटकं पागोटं नि हातात एक काठी विठू हळूच त्या व्यक्तीजवळ गेला आणि तिच्या पायाला हात लावीत उद्गारला.

" मी हाय इठू ! "

म्हाताऱ्या सदबाचा विश्वास बसेना. थोड्याशा अधू झालेल्या डोळ्यांनी त्याने नीट निरखून पाहिलं. आणि त्याच्या डोळ्यातलं आश्चर्य विरलं. त्याने विठूचा हात आपल्या हातात घेतला आणि शांतपणे खाली मान घालून तो हळू हळू आंधळ्या गोविंदशाहीराच्या जवळ आला.

" शाहीरदादा, ह्यो इठू आलाय," सदोबाने प्रेमाने त्या आंधळ्या शाहीराला बातमी दिली. आंधळ्या गोविंदशाहीराची सुरकुतलेली कातडी थरारली. " कुठे आहे ?" असं म्हणून त्याने विठूला जवळ ओढून आलिंगन दिलं. ते देत असताना त्याने आपला उजवा हात प्रथम विठूच्या डाव्या हाताच्या बाहीवरून व नंतर त्याच्या उजव्या हाताच्या बाहीवरून संथपणे खांद्यावरून पंजापर्यंत फिरवला. आणि अनिर्वचनीय समाधानात त्या शाहीराने आपली आलिंगनाची मिठी सोडली. तुरळक जुन्या ओळखीच्या काही व्यक्तींनीं राम राम केले; पण फार वेळ कुणी खोळबलें नाहीं. साठ वर्षांचा आंधळा गोविंदशाहीरही चार पावलें म्हाताऱ्या सदोबाबरोबर व विठूबरोबर चालून मग आपल्या निवाऱ्याच्या जागेकडे वळला.

अनंत ताऱ्याच्या आणि अगणित विजेच्या दिव्यांच्या प्रकाशात म्हातारा सदोबा आणि विठू हातात हात घालून चालत होते. पुष्कळशा माहित असलेल्या गोष्टींचीच उजळणी म्हातारा सदोबा करीत होता. मात्र विनाप्रयास नि विनादुःख. पण पत्रातून त्रुटित स्वरूपात कळलेल्या बातम्या विठूच्या मनात आता हाडामासाने भरून येत होत्या. एम्. एच. ई. च्या प्रचारयंत्रानें सुरवातीला आळविलेलें स्वप्न मराठमोळ्याच्या दृष्टीआड झाले होतें. चालू घटनांच्या दाबानें "विजेच्या गावा"ला जबरदस्त धक्का पोहोचला आणि त्याच्या सभोवतालच्या टापूत सुखसमृद्धीच्या शांत अवताराऐवजी स्फोटक द्रव्यें आणि इतर युद्धसामुग्री चोवीस तासाच्या कराराने तयार करणारे कारखाने आपलें सीमेंट कॉंक्रीटी ठाण मांडून बसले. ह्या अविरत यंत्रभ्रमणात तुक्या प्राणाला मुकला होता. एका स्फोटात त्याच्या ठिकऱ्या झाल्या होत्या. साळुंकीचा सौभाग्याचा टिळा पुसला गेलेला म्हाताऱ्या सदूबानें उघड्या डोळ्यानी पाहिला. पण मराठ्याच्या रक्तातली रग यंत्रानाहि जिरवता येणं अशक्य. साळुंकीचा संसार उघडा पडला तर त्याला म्हातारा सदूबा कसा सावरणार अशी विवंचनाहि त्या पाढऱ्या केसाच्या कणखर मर्दाला शिवली नाहीं. तो कामावर जायला तयार झाला. नव्हे साळुंकीला न सांगता एक दिवस त्यानें मजूरी केलीहि. त्यानंतर मात्र सुनेनें त्याला कामावर जाऊ दिलें नाहीं. अस्सल मराठ्याची ती बायको होती. तिच्याहि मनगटात मराठ्याच्या रक्ताची रग होती. तिनें आपल्याला आणि म्हाताऱ्या सदोबाला भाकरी मिळवली. त्या दोन जीवाचं हें जगणं केविलवाणेपणाचं नव्हतं. आणि आपल्या न कापणाऱ्या आवाजांत हा सर्व वृत्तांत विठूला सांगतांना म्हाताऱ्या सदोबाची वृत्तीहि केविलवाणी नव्हती.

थोड्याच वेळांत म्हातारा सदोबा आणि विठू एका अर्ध्या खणी काकीटच्या खोलीत पोहोचले. आंत धुरकटलेल्या एका लहान बल्बांतून

विजेचा प्रकाश खोलीतल्या सामानाला अंधुकसा उजाळा देत होता. साळुकीनें स्वयपाक तयार केला होता आणि ती सासऱ्याची वाट पहात पण निश्चित अशी बसली होती. म्हातारा सदोबा दारातून आत शिरला तशी ती उठली आणि काही बोलणार इतक्यात सदाबाच्या मागोमाग आलेल्या विठूला तिने बघितलं. विठूने खाद्यावरच बिस्तर खाली टेकल आणि आपल्या आईच्या पायांवर मस्तक टेवल. त्या अधुक प्रकाशातहि तिचं रित कपाळ त्याच्या डोळ्यात भरल.

साळुंकीने आपल्या पिलाला पोटाशीं घट्ट धरल. त्याच्या तोंडावरून हात फिरवीत ती उद्गारली.

" औक्षवत न्हावं. "

विठूने अंगावरचं कपडे उतरले आणि हातपाय व तोंड धुण्यासाठी तो बाहेर खोलीच्या पायऱ्याशेजारी असलेल्या नळावर गेला. त्यानें पाण्याकरता नळ सोडला, त्याबरोबर खालीं साचलेल्या पाण्याच्या लहानशा, उथळ डबक्यातून एक बेडूक टुणदिशी उडी मारून कोरड्या जमीनीवर आला.

क्षणैक विठू बिचकला.

नि मग हसला !

आकाशात तारे होते आणि जमिनीवर विजेचे पांढरे, तांबडे, हिरवे दिवे होते.

# युगवाणी प्रकाशन

## प्रकाशित

(१) **पहिली सलामी** ( कादंबरी )—प. त्रि. सहस्रबुद्धे
(२) **कांहीं कविता** ( कविता संग्रह)—बा. सी. मर्ढेकर
(३) **तिसरें सत्य** ( कथासग्रह )—व्यंकटेश वकील
(४) **सोव्हियेट दर्शन** ( लेख संग्रह )—के. नारायण काळे
(५) **आपले अण्णा** ( बालसाहित्य )—व्यंकटेश वकील
(६) **पाणी** ( कादंबरी )—बा. सी. मर्ढेकर

## इतर

(१) **आदर्श कुलस्वामिनी**
(२) **हुतूतू**

## आगामी

**नेते आणि नियंते**—व्यंकटेश वकील
**आणखी कांहीं कविता**—बा. सी. मर्ढेकर